# नवभारत

वर्ष २२ वे ] एप्रिल १९६९ [ अंक ७



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.













नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) | धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ८०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १०४·०० |
| (२) | धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | |
| | साधी बांधणी ... ... ... | १५०·०० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १८२·०० |
| (३) | धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | ४५·०० |
| | कापडी बांधणी ... .... ... | ६३·०० |
| (४) | मीमांसादर्शन ... ... ... ... | ३०·०० |
| (५) | मीमांसाकोश ... भाग १ ते ७ (संपूर्ण) | २५०·०० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | ६·०० |
| (७) | बौद्धागमार्थसंग्रहः .... ... ... | २०·०० |
| (८) | नवमानवतावाद ... ... ... | २·५० |
| (९) | मानवाचा आदर्श ... ... ... ... | ३·०० |
| (१०) | चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३.०० |
| (११) | गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | २.५० |
| (१२) | महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | २·०० |
| (१३) | सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती (प्र. रा. देशमुख) | ४·०० |
| (१४) | इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | ६·०० |
| (१५) | लोकशाहीचे धोके (श्री. पन्नालाल सुराणा) ... | २·०० |
| (१६) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श (सौ. कमल पाध्ये) | २·०० |

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष बाविसावे
अंक सातवा

# नवभारत

एप्रिल
१९६९

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ' नवभारत ' मासिक,
' गणेश भुवन ' २७६, तेलंग रोड, माटुंगा– मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि॰ सातारा )

३ चौकशी : श्री. बा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५४

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनु. बा. रं. सुंठणकर

# " आणि तुम्ही जीवनाची निवड करा "

( विख्यात मानसशास्त्रज्ञ आणि विचारवंत एरिख् फ्रॉम यांच्या Sane Society या पुस्तकाचा समारोप त्यांनी शेवटच्या प्रकरणात केला आहे. त्याचा हा स्वैर अनुवाद आहे. हे पुस्तक इंग्लंडमध्ये प्रथम १९५६ साली प्रसिद्ध झाले. )

## मानवेतिहासातील परिवर्तने

प्राणिसृष्टीत मनुष्यप्राण्याचा उदय होणे ही निव्वळ निसर्गाची एक लहरच म्हटली पाहिजे. इतर प्राण्यापाशी त्यांच्या क्रियांचे नियमन करणारी जी सहजप्रवृत्तींची सामग्री असते, ती मानव गमावून बसला होता; त्यामुळे तो त्यांच्या मानाने अधिक असहाय्य बनला होता. जीवरक्षणाच्या झगड्यात त्याची सिद्धता कमी होती. तथापि त्याच्यामध्ये विचार, कल्पना आणि आत्म-जाणीव या शक्तींची वाढ झाली होती. हाच तो स्वतः आणि त्याचा भोवतालचा निसर्ग यांच्यात परिवर्तन घडवून आणण्याचा पाया होता. प्रारंभीच्या कित्येक हजार पिढ्या मानव मृगया आणि अन्नसंग्रह करून जगत होता. अद्यापिही तो निसर्गालाच जखडला होता. निसर्गापासून आपण दूर फेकले जाऊ की काय या भीतीत तो वावरत होता. तो प्राण्याशी तद्रूप होऊन देवाना निसर्गाचे प्रतिनिधि मानून भजत होता. विकासाची गति अतिशय मंद होती. दीर्घ कालावधीनंतर मानवाने जमिनीची मशागत करण्याला सुरवात केली; शेती आणि पशुसंगोपन यावर आधारलेल्या नव्या सामाजिक आणि धार्मिक पद्धति त्याने निर्माण केल्या. याच कालखंडात देवतांच्या अंगी नैसर्गिक प्रसवशक्ती असते असे कल्पून तो त्यांची पूजा करू लागला. तो स्वतःला भूमातेच्या सुपिकतेवर अवलंबून रहाणारे, मातेच्या जीवनदायी स्तनावर पोसले जाणारे, बालक म्हणून समजत होता. सुमारे चार हजार वर्षापूर्वी मानवी इतिहासात एक निर्णायक परिवर्तन घडून आले. निसर्गाच्या पकडीतून बाहेर पडण्याच्या दीर्घ प्रक्रियेत मानवाने एक नवे पाऊल टाकले. निसर्गाची बंधने तोडून नव्या ध्येयाच्या दिशेने तो वाटचाल करू लागला. हे ध्येय म्हणजे पूर्णत्वाने जगणे, पूर्णपणे जागे रहाणे आणि संपूर्ण मानव होणे, मुक्त होणे हे होय. बुद्धि आणि सदसद्विवेक ही त्याची मार्गदर्शक तत्वे झाली. बंधुप्रेम, न्याय, सत्य यांच्या बंधनानी बांधलेला समाज, कायमचे गमावून बसलेल्या निसर्गाच्या घरकुलाची जागा घेणारे खरेखुरे निवासस्थान निर्माण करणे, हे त्याचे उद्दिष्ट झाले.

तसेच पुनः ख्रिस्तपूर्व पाचशेच्या सुमारास भारत, ग्रीस, पॅलेस्थइन, इराण आणि चीन येथील महान धर्मपद्धतींच्या द्वारे मानवजातीच्या एकतेची आणि अखिल मानवतेच्या मुळाशी असणाऱ्या एकीकरणाच्या आध्यात्मिक तत्वाची कल्पना एका नव्या विकसित स्वरूपात व्यक्त होऊ लागली. लाओत्से, बुद्ध, इसाजा, हिराक्लिटस आणि सॉक्रेटिस आणि नंतर पॅलेस्टाइनच्या भूमीत जीझस आणि इतर धर्मोपदेशक, अमेरिकेच्या भूमीत क्वेझलकोट्ल आणि त्याच्याही नंतर अरब देशात महमद यानी मानवाच्या ऐक्याच्या, बुद्धीच्या, प्रेमाच्या, न्यायाच्या कल्पनांची शिकवण दिली.

उत्तर युरोप दीर्घ निद्रेत घोरत पडला होता. ग्रीकी आणि ख्रिस्ती कल्पना त्याच्या भूमीपर्यंत पोचण्याला आणि त्याच्या अंगीं भिनण्याला एका सहस्रकाचा काळ लोटावा लागला. इ. स. १५०० च्या सुमारास एका नव्या युगाचा आरंभ झाला. मानवाने निसर्गाचा आणि मानवी व्यक्तित्वाचा शोध घेतला; आणि भौतिक शास्त्रांचा पाया घातला. त्यामुळे पृथ्वीची कळाच बदलू लागली. मध्ययुगाचे बंदिस्त जग कोलमडून पडले; सर्वांना एकत्र गोवणाऱ्या स्वर्गाचा भंग झाला; विज्ञानाच्या रूपाने मानवाला एकतेचे नवे तत्व गवसले. निसर्गावर प्रभुत्व मिळविण्याकरिता आणि सामाजिक आणि राजकीय एकीकरणाच्या द्वारे एका नव्या एकतेचा तो शोध घेऊ







लागला. यहुदी खिस्तीपरंपरेच्या द्वारे त्याला नैतिक सदसद्बुद्धीचा वारसा प्राप्त झाला होता; आणि ग्रीकाकडून बौद्धिक सदसद्बुद्धीचा वारसा त्यांच्याकडे आला होता. या दोन्हींचा संयोग झाल्याने मानवी सर्जनशक्तीला पूर्वी कधी नव्हता इतका बहर आला

सांस्कृतिकदृष्ट्या बोलावयाचे तर युरोप हे मानवजातीचे सर्वात लहान बालक होते. पण त्याने इतकी संपत्ति आणि अस्त्रे वाढविली की, कित्येक शतकेपर्यंत बाकीच्या सर्व जगाचा तो धनी बनला. परंतु विसाव्या शतकाच्या मध्याला पूर्वी कधीही घडले नव्हते असे जबरदस्त परिवर्तन घडून येत आहे. माणसे आणि प्राणी यांच्या शारीरिक शक्तीची जागा वाफ, तेल आणि विद्युत् यांच्या शक्तीवर चालणाऱ्या नव्या तंत्रानी घेतली आहे. त्यांनी निर्माण केलेल्या परिवहनाच्या साधनांच्या योगाने पृथ्वीचे रूपांतर अवघ्या एका खंडात, सर्व मानववंशाचे रूपांतर सगळ्या मानवसमूहांचे भवितव्य एकत्र गोवणाऱ्या एका अवघ्या समाजात होत आहे. त्यांनी निर्माण केलेल्या आश्चर्यकारक उपकरणानी वाङ्मय, कला आणि संगीत यांच्या क्षेत्रात जे सर्वोचित असेल ते समाजाच्या प्रत्येक घटकापर्यंत पोचविले जात आहे. त्यांनी पैदा केलेल्या उत्पादक साधनानी प्रत्येक व्यक्तीला प्रतिष्ठेचे आधिभौतिक जीवन जगणे शक्य होईल आणि दिवसाच्या केवळ काही वेळापुरते तेवढेच श्रम मानवाला करावे लागतील.

तथापि आज मानव एका नव्या, अधिक संपन्न आणि अधिक सुखी युगाच्या उंबरठ्याशी पोचला असतानाच तो आणि त्याच्यामागून येणाऱ्या पिढ्या पूर्वी केव्हाहीपेक्षा अधिक धोक्यात आल्या आहेत. हे कसे शक्य झाले ?

## मानव स्वतंत्र होऊनही परतंत्रच

मानवाने धार्मिक आणि ऐहिक सत्तांपासून आपले स्वातंत्र्य मिळविले होते. आपल्या बुद्धीच्या जोरावर तो स्वतःच्या पायावर उभा राहू लागला. त्याने सदसद्बुद्धीलाच आपला एकमेव न्यायाधीश केले. पण नूतनसंपादित स्वातंत्र्याची त्याची त्यालाच भीति वाटत होती. त्याला 'स्वातंत्र्य' मिळाले होते; पण अद्याप तो खऱ्या अर्थाने स्व–तंत्र झाला नव्हता. आपले स्वतःचे सत्यरूप त्याला गवसले नव्हते. अद्याप तो निर्माता, पूर्णतः जागृत झाला नव्हता. त्याची खास सिद्धि, निसर्गावर त्याने मिळविलेले प्रभुत्व, यानी त्याच्या पलायनासाठी मार्ग खुले केले होते.

नवी औद्योगिक यंत्रणा उभी करताना या नव्या कामगिरीत मानव इतका गढून गेला होता की, तीच त्याच्या जीवनाचे सर्वोच्च ध्येय बनली. एकेकाळी देव आणि मोक्ष यांच्या शोधाच्या मागे लागलेल्या त्याच्या शक्ती आता निसर्गावर प्रभुत्व मिळविण्याकरता आणि सतत वाढत्या भौतिक सुखप्राप्त्यर्थ झटू लागल्या. आपले जीवन अधिक चांगले करण्याचे साधन म्हणून उत्पादनाचा उपयोग करण्याचे त्याने बंद केले आणि उत्पादनालाच त्याने ध्येयस्थानी मानले आणि जीवनाला गौणरूप दिले. सतत वाढत्या श्रमविभागणीच्या, कामाच्या सतत वाढत्या यांत्रिकीकरणाच्या आणि सतत वाढत्या व्याप्तीच्या सामाजिक सामूहीकरणांच्या प्रक्रियेत मानव स्वतःच त्या यंत्रणेचा धनी होण्याऐवजी तिचाच एक भाग बनला. एक पण्यवस्तु, एक भांडवली गुंतवणूक या नात्याने तो स्वतःचा अनुभव घेऊ लागला. यशस्वी होणे, बाजारपेठेत शक्य तितक्या किफायतीने स्वतःचा विक्रय करणे, हे त्याचे ध्येय बनले. व्यक्ती या नात्याने त्याचे मूल्य प्रेम, बुद्धि या मानवी गुणात किंवा त्याच्या कलात्मक शक्तीत नसून त्याच्या क्रयशीलतेत सामावले आहे. सौख्य म्हणजे नवनव्या आणि अधिक चांगल्या वस्तु वापरणे, गाणेबजावणे, चित्रपट, मौजमजा, कामुकता, मद्य आणि धूम्रपान या गोष्टींचे समीकरण झाले आहे. त्याची 'स्व'ची जाणीव बहुसंख्याशी जुळवून घेण्याशिवाय दुसऱ्या कशानेही होत नसल्यामुळे तो असुरक्षित चिंताग्रस्त आणि दुसऱ्याच्या पसंतीवर अवलंबून रहाणारा असा बनला आहे. तो स्वतःलाच पारखा होतो, स्वतःच केलेल्या उत्पादनाची तो पूजा करतो. त्याने स्वतःच निर्माण केलेल्या पुढाऱ्यांच्या जणू काही ते त्याची स्वतःची निर्मिति नव्हेत असे समजून तो भजनी लागतो. एका अर्थी खिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकातील महान मानवी उत्क्रांति होण्यापूर्वी ज्या अवस्थेत मानव होता तेथेच तो परत गेला आहे.

प्रेम करण्याला, बुद्धीचा उपयोग करण्याला, निर्णय घेण्याला, तो असमर्थ झाला आहे. वस्तुतः जीवनाचे मूल्य समजून घेण्याच्या कामी तो असमर्थ ठरला आहे; आणि म्हणून प्रत्येक गोष्टीचा नाश करण्याला तो प्रवृत्त होत आहे. जगाची पुनः शकले झाली आहेत; त्याचे ऐक्य नष्ट झाले आहे. पुनः तो विविध प्रकारांच्या वस्तूंची पूजा करू लागला आहे. फरक इतकाच की, या वस्तु आता निसर्गाचा भाग असण्याऐवजी त्या मानवनिर्मित आहेत.

## आधुनिक मानवाचे उद्दिष्ट– सूज्ञ समाज

हे नवे युग पुढे सरसावले, ते वैयक्तिक उपक्रमशीलतेची कल्पना घेऊनच. आणि खरोखरीच वैयक्तिक उपक्रमांना भरतीही आली. १६ व्या आणि १७ व्या शतकातील नव्या जगाचे आणि नव्या सागरी मार्गांचे संशोधक, विज्ञानाचे अग्रगामी, नव्या तत्वपद्धतींचे संस्थापक, इंग्लिश, फ्रेंच, अमेरिकन क्रांत्यांचे मुत्सद्दी आणि तत्वज्ञ आणि आपाततः औद्योगिक क्षेत्रातील अग्रेसर आणि लुटारू सरदारदेखील, यानी विस्मयकारक वैयक्तिक उपक्रमशीलता दाखविली. पण भांडवलशाहीच्या नोकरशाहीकरणाबरोबर आणि व्यवस्थापकीकरणाबरोबर नेमकी ही उपक्रमशीलताच लोप पावत आहे. नोकरशाहीपाशी फारच थोडी उपक्रमशीलता असते. नोकरशाही स्वभावतःच तशी असते; तिच्यापाशी स्वयंप्रेरणा नसते. भांडवलशाहीचे समर्थन करण्याकरिता वैयक्तिक उपक्रमशीलतेसाठी जी हाकाटी करण्यात येत आहे, ती म्हणजे उत्तमात उत्तम माहेरच्या भेटीच्या उत्कंठेसारखी आहे आणि वाईटात वाईट खऱ्या मानवी वैयक्तिक उपक्रमशीलतेच्या कल्पनेवर आधारलेल्या सुधारणेच्या योजनेविरुद्ध करण्यात येणारी फसवी घोषणा आहे. आधुनिक समाजाने मानवी गरजांची पूर्ति करणारी संस्कृति निर्मिण्याची दृष्टी समोर ठेवून आरंभ केला होता. त्याने आपल्यासमोर ध्येय ठेवले, ते वैयक्तिक आणि सामाजिक गरजा यांच्यामध्ये सुसंवाद निर्माण करण्याचे, मानवी स्वभाव आणि समाजपद्धति यांच्यातील संघर्षाचा शेवट करण्याचे. हे ध्येय दोन रीतींनी साध्य होईल अशी कल्पना होती. एक उत्पादन तंत्राच्या विकासामुळे प्रत्येक व्यक्तीचे पोषण समाधानकारकपणे करणे शक्य होईल आणि दुसरी मानव आणि त्याच्या खऱ्या गरजा यांचे बुद्धियुक्त वस्तुनिष्ठ चित्र उभे करता येईल. हेच निराळ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास आधुनिक मानवाच्या यत्नांचे उद्दिष्ट सूज्ञ समाज निर्माण करणे हे होते. हेच अधिक स्पष्ट करावयाचे तर त्याचा अर्थ असा : असा समाज निर्माण करणे की, ज्यातील सदस्यांच्या बुद्धीचा विकास वस्तुनिष्ठतेच्या अशा बिंदूपर्यंत पोचला पाहिजे की, त्याला स्वतःला, इतरेजनाना, निसर्गाला बालिश सर्वज्ञतेच्या किंवा मनोभ्रांतीच्या द्वेषाने विकृत झालेल्या स्वरूपात नव्हे, तर त्यांच्या सत्य स्वरूपात पाहाणे शक्य झाले पाहिजे. अशा समाजातील व्यक्तींचे बुद्धिस्वातंत्र्य चांगले आणि वाईट यांच्यातील फरक जाणण्याइतके झाले पाहिजे; त्याना स्वतःची निवड करता आली पाहिजे; त्यांच्यापाशी मते असण्यापेक्षा निष्ठा, भोळ्या समजुतीपेक्षा किंवा अधिक आशापेक्षा श्रद्धा असली पाहिजे. अशा समाजातील सदस्यांची मुले, त्यांचे शेजारीपाजारी, सर्व माणसे, सारा निसर्ग आणि ते स्वतः यांच्यावर प्रेम करण्याची शक्ति वृद्धिंगत होते. त्यांच्यामध्ये आत्मौपम्य बुद्धि उत्पन्न होऊनही ते स्वतःच्या व्यक्तित्वाची आणि एकात्मतेची जाणीव बाळगतील; ते निसर्गावर मात करतील, ती त्याचा नाश करून नव्हे तर नवनिर्मिति करूनच.

आतापर्यंत आम्ही अपेशी ठरलो आहो समाजात असा एक अल्पसंख्य वर्ग आहे की, ज्याना या ध्येयाचा साक्षात्कार झाला आहे आणि जे त्यानुसार जगण्याचा प्रयत्न करीत आहेत पण बाकीचा बहुसंख्य वर्ग मनोवृत्तीने फार मागसलेला आहे. अद्याप तो अश्मयुगात आहे; प्रतिमापूजन, मूर्तिपूजा, सरंजामशाही वृत्ती यातच वावरत आहे. या दोन वर्गामधील खिंडारावर अद्याप आपण सेतु बांधला नाही. या बहुसंख्य वर्गात सूज्ञता आणता येईल का ? किंवा मानवी बुद्धीचे महत्तम शोध स्वतःचा बुद्धिविरोध आणि वेडेपणा यांच्यात कारणी तो लावणार आहे का ? आगेकूच करण्याला जे घाबरतात त्यांच्यात जीवनशक्ती चेतविणाऱ्या, चांगल्या, सूज्ञ जीवनाची दृष्टी निर्माण करण्यास आम्ही समर्थ होऊ का ? यावेळी मानवजात अशा फाट्यावर उभी आहे की, पाऊल चुकीचे पडेल तर ते शेवटचेच ठरेल.








## दोन सामाजिक राक्षस

विसाव्या शतकाच्या मध्याला दोन प्रचंड सामाजिक राक्षस उभे टाकले आहेत. ते एकमेकाना भीत आहेत आणि दोघेही सतत वाढत्या शस्त्रास्त्रानिशी सुरक्षितता शोधू पहात आहेत. युनायटेड स्टेट्स् आणि त्याची दोस्त राष्ट्रे ही संपन्न आहेत; त्यांचे जीवनमान उच्चतर आहे. सोविएत युनिअन, त्याची उपग्रही राष्ट्रे आणि चीन या त्यांच्या प्रतिस्पर्ध्यापेक्षा ती स्वास्थ्य आणि सुख यात अधिक रस घेतात. या दोन्ही प्रतिस्पर्ध्यांचा दावा असा की, त्यांच्या पद्धति मानवाला अंतिम मुक्ती मिळवून देतात, भविष्याच्या स्वर्गसुखाची हमी देतात. दोघेही असा हक्क सांगतात की, आपले विरोधक अगदी बरोबर आपल्या उलट आहेत आणि मानवजात जर वाचवायची असेल, तर त्यांच्या पद्धतीचे उच्चाटन झाले पाहिजे. दोघेही बोलतात, ते १९ व्या शतकाच्या परिभाषेत. पश्चिम उद्घोष करते फ्रेंच क्रांतीच्या स्वातंत्र्याच्या, बुद्धीच्या, व्यक्तिवादांच्या ध्येयांचा. तर पूर्व एकता आणि समता या समाजवादी कल्पना घोषित करते. दोघेही लक्षावधी लोकांची कल्पनाशक्ती आणि कडवी निष्ठा खेचून घेण्यात यशस्वी ठरले आहेत.

या दोन्ही पद्धतींतील भेद निर्णायक आहेत. पाश्चात्य जगात प्रचलित पद्धतीवर टीकात्मक विचार व्यक्त करण्याचे स्वातंत्र्य आहे. सोविएत जगात टीका आणि भिन्न विचार यांची अभिव्यक्ती पाशवी शक्तींनी दडपून टाकण्यात येते. म्हणून पश्चिमेच्या जगात शांततामय पुरोगामी परिवर्तनाच्या शक्यतेला वाव आहे; तर सोविएत जगात अशी शक्यता जवळजवळ नाहींच. सोविएत समाजात जो माणूस कार्यक्षम, स्वयंचलित यंत्र बनत नाही, त्याच्या नशीबी येणाऱ्या कारावासाच्या, छळाच्या किंवा मृत्यूच्या दहशतीपासून पश्चिमेच्या जगातील व्यक्तीचे जीवन मुक्त आहे. खरोखरीच पश्चिमेतील व्यक्तिजीवन मानवेतिहासात कधीही नव्हते इतके संपन्न आणि आनंदी झाले आहे. सोविएत पद्धतीत जीवन कधीही आनंदमय होऊ शकणार नाही. जेथे शिरच्छेद करणारा दाराआड राहून पहारा करीत असतो, तेथील जीवन खचित कधीच आनंदी असू शकणार नाही.

पण स्वतंत्र भांडवलशाही आणि अधिकारवादी साम्यवाद यांच्यामध्ये आज जे प्रचंड भेद दिसतात. त्याकडे दुर्लक्ष न करताही त्यांच्यातील साम्यें, विशेषतः भविष्यात जशी ती वाढत जातील तशी न पहाणे हे अदूरदर्शित्वाचे लक्षण आहे. या दोन्ही पद्धति औद्योगीकरणाच्या पायावर उभ्या आहेत. सतत वाढती आर्थिक कार्यक्षमता आणि वित्त ही त्यांची उद्दिष्टे आहेत. त्यांच्या समाजाचे संचालन व्यवस्थापकवर्गाकडून आणि धंदेवाईक राजकारणी लोकांकडून होत असते. पश्चिमेचा खिस्ती तत्त्ववाद आणि पूर्वेचा ऐहिक जगदोद्धारवाद याना दुर्लक्षून दोघांचाही दृष्टिकोण संपूर्णतः भौतिकवादी आहे. मानवाची संघटना ते करतात, ती एका केंद्रीभूत पद्धतीत, मोठमोठ्या कारखान्यात, प्रचंड राजकीय पक्षात. प्रत्येकजण यंत्रातील एक खिळा असतो, आणि त्याला संथपणे कार्य करावे लागते. पश्चिमेत मानसशास्त्रीय अनुकूलनाच्या ( Conditioning ), सामुदायिक सूचनाच्या, आर्थिक पारितोषिकांच्या पद्धतीच्या द्वारे हे साध्य केले जाते. पूर्वेत ही सर्व अधिक दहशत याचा उपयोग केला जातो. सोविएत पद्धति जसजशी आर्थिकदृष्ट्या अधिकाधिक विकसित होत जाईल, तसतशी तेथील बहुसंख्य जनतेची पिळणूक कमी कमी होत जाईल. म्हणून दहशतीची जागा अधिकाधिक प्रमाणात मानसशास्त्रीय उपचारणाच्या पद्धति घेत जातील असे गृहीत धरावे लागते. पश्चिम ही हक्स्लेच्या Brave New World च्या दिशेने शीघ्र गतीने विकसित होत आहे; आणि पूर्व ऑर्वेलच्या '१९८४' च्या दिशेने आज मार्गक्रमण करीत आहे. दोन्ही पद्धति एकाच बिंदूत जाऊन मिळण्याच्या रोखाने चालल्या आहेत.

## दोन संभाव्यता– दोन संकटे

तर मग भविष्यात काय वाढून ठेवले आहे? पहिली आणि जवळ जवळ निश्चित अशी संभाव्यता म्हणजे अणुयुद्ध. अशा युद्धाचे संभवनीय पर्यवसान म्हणजे औद्योगिक संस्कृतीचा विनाश आणि कृषिप्रधान प्राथमिक पातळीवर जगाचे परागमन होय. अथवा त्या क्षेत्रातील कित्येक विशेषज्ञ समजतात तितका संपूर्ण विध्वंस होईल असे मानले, तरी त्याचा परिणाम असा होईल की, विजेत्याला साऱ्या जगाची संघटना करून त्यावर प्रभुत्व गाजविण्याची आव-












श्यकता भासू लागेल. केवळ बलावर आधारलेल्या केंद्रीभूत राज्यसत्तेकडूनच हे होऊ शकेल—मग सत्तेचे केंद्र वाशिंग्टन राहिले काय किंवा मास्को राहिले काय, त्यात विशेष फरक रहाणार नाही. परंतु दुर्दैव असे की, नुसते युद्ध टाळून सुद्धा उज्ज्वल भविष्याचे आश्वासन मिळत नाही. येत्या ५० किंवा १०० वर्षांत भांडवलशाही आणि साम्यवाद या दोहोमध्यें होणारा विकास आम्ही आमच्या दृष्टीसमोर उभा करू शकू, तर त्यावरून स्वयंचलित यांत्रिकता आणि स्वतःविषयी परकाभाव ( alienation ) यांची प्रक्रिया वाढत गेलेली दिसून येईल. दोन्ही पद्धति व्यवस्थापकीय समाजाच्या दिशेने वाढत चालल्या आहेत. अशा पद्धतींचे नागरिक पुष्ट, सुवस्त्र, तृप्तकाम असतील. त्यांच्यापाशी अतृप्त कामना रहाणार नाहीत. ते स्वयंचलित यंत्रेच असतील— कोणत्याही प्रेरकाशिवाय चालणारी, नेत्याशिवाय मार्गदर्शित होणारी, माणसासारखी वागणारी यंत्रे तयार करणारी आणि यंत्रासारखी काम करणारी माणसे निर्माण करणारी अशी यंत्रेच असतील. या माणसांच्या अंगची हुषारी वाढेल, पण त्यांच्या बुद्धीचा ऱ्हास होईल. अशाप्रकारे मानव महत्तम भौतिक शक्तींनी सज्ज होईल; पण त्या शक्तीचा वापर करण्याचे शहाणपण मात्र त्याच्यापाशी असणार नाही, अशी भीतिदायक स्थिति निर्माण होईल.

ही स्वयंचलित यांत्रिकता आणि हा परकाभाव यांच्यामुळे असंमजसपणात सतत भर पडत जाते; जीवनाला अर्थ रहात नाही; तेथे आनंद नसतो; श्रद्धा नसते; वास्तवता नसते. प्रत्येकजण ' सुखी ' असतो. फरक इतकाच की, तो भावत नाही, बुद्धि चालवत नाही, प्रेम करीत नाही.

' ईश्वराचा मृत्यु ' हा १९ व्या शतकासमोरील प्रश्न होता. ' मानवाचा मृत्यु ' हा २० व्या शतकासमोरील प्रश्न आहे. १९ व्या शतकात अमानुषता याचा अर्थ क्रूरता असा होता. २० व्या शतकात तिचा अर्थ दुभंगलेला स्वतःविषयींचा परकाभाव असा होत आहे. माणसे गुलाम बनतात हे भूतकाळाचे संकट होते. माणसे यांत्रिक मानव बनतील हे भविष्यकाळाचे संकट आहे. आता हे खरे आहे की, यांत्रिक मानव बंड करून उठत नाही. पण मानवी स्वभाव पहाता यांत्रिक मानव सूज्ञ राहू आणि जगू शकत नाही. ते भस्मासूर होतात आणि स्वतःच्या जगाचा आणि स्वतःचाही नाश करतात. कारण अर्थहीन जीवनाचा कंटाळवाणेपणा ते सहन करू शकत नाहीत.

आमच्यावर कोसळू पहाणारी संकटे म्हणजे युद्ध आणि यांत्रिक मानुषता. याला पर्याय कोणता ? ज्या चाकोरीतून आज आम्ही जात आहोत, तीतून बाहेर पडणे आणि मानव्याचा जन्म होण्याच्या आणि आत्म-साक्षात्कार घडून येण्याच्या दिशेने पुढचे पाऊल टाकणे हाच होय. यात पहिली अट ही की, सध्या आम्हा सगळयावर टांगते असलेले आणि श्रद्धा आणि उपक्रमशीलता याना बधिर करणारे युद्धाचे भय नष्ट झाले पाहिजे. सगळया मानवांच्या जीवनाची जबाबदारी आम्ही आमच्या स्वतःवर घेतली पाहिजे. आणि सर्व मोठ्या राष्ट्रांनी केलेला अंतर्गत विकास आंतरराष्ट्रीय प्रमाणावर विस्तारित केला पाहिजे; संपत्तीची सापेक्ष वाटणी आणि आर्थिक साधनसामग्रीची नव्याने आणि अधिक न्याय्य विभागणी झाली पाहिजे. आपाततः यातून आर्थिक सहकार्याच्या आणि नियोजनाच्या आतरराष्ट्रीय स्वरूपाप्रत, जगत्-शासनाच्या स्वरूपाप्रत, आणि संपूर्ण निःशस्त्रीकरणाप्रत पोचले पाहिजे. औद्योगिक पद्धति ही ठेवावीच लागेल. पण श्रम आणि राज्य यांचे अशा प्रकारे विकेंद्रीकरण केले पाहिजे की, त्या योगे योग्य मानवी प्रमाण साधता आले पाहिजे आणि उद्यमाच्या गरजांना आवश्यक असणाऱ्या सर्वोचित बिंदूपर्यंतच तेवढा केंद्रीकरणाला वाव दिला पाहिजे. आर्थिक क्षेत्रात उद्योगधंद्यात काम करणाऱ्या सर्वांच्या सक्रिय आणि जबाबदारीच्या सहभागित्वाला वाव देण्यासाठी सह-व्यवस्थापनाची आवश्यकता आहे. अशा सहभागित्वाची नवी रूपे शोधून काढता येणे शक्य आहे. राजकीय क्षेत्रात नागरसभांकडे परत गेले पाहिजे आणि त्यासाठी सुजाण, विचारविनिमय करणारे, समोरासमोर येणारे लहान लहान गट हजारांनी निर्माण झाले पाहिजेत आणि त्यांचे निर्णय ' कनिष्ठ सभागृहा'च्या द्वारे एकत्रित केले गेले पाहिजेत. सांस्कृतिक पुनर्जीवन झाले पाहिजे आणि त्यात तरुणाचे व्यवसाय-शिक्षण, प्रौढ-








शिक्षण आणि लोकाच्या आवडत्या कला आणि ऐहिक विधी यांचा राष्ट्रव्यापी संयोग झाला पाहिजे.

## एकमेव पर्याय

यांत्रिक मानुषतेच्या संकटातून मुक्त होण्याचा एकमेव पर्याय म्हणजे मानवतावादी सामूहिकतावाद ( Humanistic communilarianism ) हा होय. हा प्राथम्याने मत्तेच्या मालकीचा फायदेशीर प्रश्न नाही; किंवा नफ्याच्या वाटणीचाही प्रश्न नाही. येथे प्रश्न आहे, तो कामाच्या वाटणीचा, अनुभवात सहभागी होण्याचा. मालकीत बदल होणे अवश्य आहे. पण ते बदल श्रमाचा समाज निर्माण करण्याकरिता झाले पाहिजेत; आणि नफ्याचा हेतू सामाजिकदृष्ट्या धोकादायक होणार नाही असेच ते घडून आले पाहिजेत. प्रत्येकाला प्रतिष्ठेचे जीवन जगण्याकरिता भौतिक पाया घालता येईल इतक्या प्रमाणात उत्पन्नात समानता आली पाहिजे; आणि अशा प्रकारे आर्थिक भेदामुळे निरनिराळ्या सामाजिक वर्गांना मूलभूत दृष्ट्या जीवनाचे जे भिन्न भिन्न अनुभव येतात, ते नाहीसे झाले पाहिजेत. समाजाच्या सर्वोच्च स्थानावर पुनः मानवाची प्रतिष्ठापना होणे अवश्य आहे. मानव हा कधीही साधन म्हणून वापरला जाता कामा नये; दुसऱ्यांनी किंवा त्याने स्वतःही वापरावयाची वस्तु म्हणून त्याचा उपयोग होता कामा नये. मानवाकडून मानवाचा उपयोग केला जाणे बंद झाले पाहिजे; आणि अर्थकारण हे मानवाचा विकास करणारा सेवक बनले पाहिजे. भांडवलाने श्रमाची आणि वस्तूंनी जीवनाची सेवा केली पाहिजे. १९ व्या शतकातील पिळणुकीकडे आणि संचयनाकडे असलेली सम्मुखता ( orientation) आणि आजची परिग्रहणाकडे आणि व्यापारीवृत्तीकडे असणारी उन्मुखता यांच्याऐवजी उत्पादनसम्मुखता हे सगळ्या सामाजिक रचनाकार्यांचे उद्दिष्ट असले पाहिजे.

## नवा युगधर्म

कोणताही बदल बलाच्या जोरावर करता कामा नये; आणि तो आर्थिक, राजकीय आणि सांस्कृतिक क्षेत्रात एकसमयावच्छेदेकरून घडून आला पाहिजे. केवळ एकाच क्षेत्रापुरते मर्यादितपणे होणारे बदल इतर बदलांच्या बाबतीत विनाशकारी ठरतात. प्राथमिक मानव ज्याप्रमाणे निसर्गशक्तींच्या पुढे असहाय्य होत होता, त्याप्रमाणे आधुनिक मानव आज त्याने स्वतःच निर्मिलेल्या सामाजिक आणि आर्थिक शक्तींच्या पुढे असहाय्य होत आहे. स्वहस्ते तयार केलेल्या कृतींचीच तो पूजा करीत आहे, नव्या मूर्तींना नमन करीत आहे; आणि असे करीत असतानाच ज्या देवाने त्याला सगळ्याच मूर्ती नष्ट करण्याची आज्ञा केली आहे त्याचीच शपथ घेऊन तो हे सर्व करीत आहे. स्वतःच्या वेडेपणाच्या पर्यवसानापासून मानवाला जर स्वतःचा बचाव करावयाचा असेल, तर त्यासाठी एकमेव मार्ग म्हणजे मानवाच्या मूल अवस्थांमध्ये बद्धमूल असणाऱ्या त्याच्या गरजांशी जुळणारा असा सूज्ञ समाज निर्माण करणे हा होय. अशा समाजात मानवामानवातील नाते प्रेमांचे असेल, रक्त आणि भूमी यांच्या रज्जूंनी बांधला जाण्याऐवजी बंधुभाव आणि ऐक्यभाव यांच्या बंधनात तो बद्धमूल होईल; निसर्ग ओलांडून पुढे जाण्याची शक्यता त्याला प्राप्त होईल हे विध्वंसनाने नव्हे तर निर्मितीच्या साहाय्याने. या समाजात प्रत्येकाला ‘स्व’ची जाणीव त्याने स्वतःच्या शक्तींना जुळवून घेण्याने न होता त्या शक्तींचा कर्ता या नात्याने येणाऱ्या अनुभवातून उत्पन्न होईल; आणि वास्तवतेला विकृत रूप देण्याची आणि वेगळ्या मूर्तींची पूजा करण्याची गरज न पडता नवी निष्ठा आणि नवा युगधर्म देणारी पद्धती या समाजात अस्तित्वात येईल.

असा समाज निर्माण करणे पुढचे पाऊल टाकणे होय. त्याचा अर्थ "मानवसदृश" (Humanoid) इतिहासाचा शेवट करणे असा होतो. तसेच ‘दिनक्रमा’चा शेवट, ‘परिपूर्ति’ असा त्याचा अर्थ नव्हे. समस्या किंवा संघर्ष समोर उभ्या रहाणार नाहीत अशी संपूर्ण सुसंवादी अवस्था प्राप्त होणे असाही त्याचा अर्थ नव्हे. उलट पक्षी, मानवाचे भवितव्यच असे आहे की, त्याचे अस्तित्व विरोधांनी भरलेले आहे आणि ते विरोध सोडविण्याचे त्याने कितीही प्रयत्न केले तरी ते संपणार नाहीत. ज्यावेळी नरबळी देण्याच्या अवस्थेतून मानव बाहेर पडतो मग ते अझ्टेक जमातीच्या धार्मिक विधींच्या रूपात असो वा युद्धभूमीच्या इहलौकिक रूपात असो, ज्यावेळी निसर्गाशी त्याचे नाते आंधळेपणाऐवजी बुद्धिप्रामाण्याचे असेल,

ज्यावेळी वस्तु त्याची दैवते बनण्याऐवजी खरोखरीच त्याचे सेवक बनतील त्यावेळी खरेखुरे मानवी संघर्ष आणि समस्या त्याच्यासमोर उभ्या रहातील; त्यावेळी तो साहसी, धीट, कल्पक, सुखदुःखे भोगण्याला समर्थ होईल. पण त्याच्या शक्ती मृत्यूच्या नव्हे तर जीवनाच्या सेवेला लागतील. मानवी इतिहासाची नवी अवस्था ज्यावेळी प्राप्त होईल त्यावेळी अंत नव्हे तर एक नवा आरंभ होईल.

## आणि तुम्ही जीवनाची निवड करा

मानवासमोर आज एक अत्यंत मूलभूत निवड आवासून उभी आहे. साम्यवाद का भांडवलशाही अशी ही निवड नाही; तर यांत्रिक मानुषता ( भांडवलशाही आणि साम्यवाद या दोन्ही प्रकारांची ) का मानवतावादी सामूहिक समाजवाद अशी आहे. बहुतेक सगळ्या घटना असे दर्शवितात की, तो यांत्रिक मानुषता निवडीत आहे. याचा अर्थ असा की, अखेरीस तो वेडेपणा आणि विनाश निवडीत आहे. पण या सर्व गोष्टी बुद्धि, सदिच्छा आणि सूज्ञपणा यांच्यावरील मानवाची श्रद्धा नष्ट करण्याइतक्या पुरेशा सबल नाहीत. जोपर्यंत दुसऱ्या पर्यायांचा आम्ही विचार करू शकतो, तोपर्यंत फारसे गमावले आहे असे नाही. जोपर्यंत आम्ही एकत्र विनिमय करू शकतो आणि योजना आखू शकतो, तोपर्यंत आशा ठेवण्याला जागा आहे. पण खरोखरीच सावल्या लांबवर पसरत चालल्या आहेत; वेडेपणाचे आवाज अधिकाधिक मोठे होत आहेत. आमच्या महान गुरुजनांच्या दिव्यदृष्टीशी जुळणारी मानवी अवस्था आमच्या टप्प्यात येत आहे. तथापि, सगळ्या संस्कृतीच्या विनाशाच्या किंवा यांत्रिक मानुषीकरणाच्या संकटात आम्ही सापडलो आहोत. एका लहाशा टोळीला हजारो वर्षापूर्वी सांगण्यात आले होते की, " तुमच्यासमोर मी जीवन आणि मृत्यु, वरदान आणि शाप ठेवीत आहे – आणि तुम्ही जीवनाची निवड करा " आमचीही निवडसुद्धा हीच असली पाहिजे.

---












प्रा. श्री. गो. काशीकर

# नगरपालिका प्रशासन : सदस्य व अधिकारी यांचे संबंध*

१९६५ च्या महाराष्ट्र नगरपालिका कायद्याने स्थानिक प्रशासनाच्या क्षेत्रात बऱ्याच वादांना जन्म दिला आहे. त्यांपैकी नगरपालिकांचे निर्वाचित सदस्य आणि अधिकारी यांचे संबंध हा वाद आज बराच चर्चेचा विषय झाला आहे. अधिकारी या संज्ञेने नगरपालिकेच्या शासकवर्गाचा बोध होतो त्याप्रमाणेच नगरपालिकांवर अंकुश चालविणाऱ्या शासकीय अधिकाऱ्यांचाही तीतून निर्देश होतो. आणि ह्या दोन्ही प्रकारच्या अधिकाऱ्यांच्या संबंधांबद्दल आज बरीच चर्चा ऐकायला मिळते.

प्रस्तुत कायद्यातील एकूण ३५१ कलमांपैकी २०० हून अधिक कलमांत मुख्य अधिकाऱ्याला ( Chief Officer ) काहीना काही अधिकार दिलेले आहेत. मुख्य अधिकारी हाच नगरपालिकेचा प्रधान शासनाधिकारी आहे अशी ह्यामध्ये भूमिका दिसते. परंतु कलम ७७ ( १ ) ( अ ) च्या प्रारंभी मुख्य अधिकाऱ्याच्या अधिकारांना जी एक अट घातली आहे तीमुळे त्याला आपले कोणतेही अधिकार स्वतः होऊन वापरणे असंभव होऊ शकते व प्रत्यक्षात नगरपालिकेचा अध्यक्ष हाच खराखुरा शासनाधिकारी आणि मुख्य अधिकारी म्हणजे केवळ त्याचे हातातील साधन अशी परिस्थिती निर्माण होऊ शकते असे म्हटले जाते. म्हणून ह्या कलमाचा जरा खोलवर विचार करणे आवश्यक आहे. हे कलम असे–

"77 (1) The Chief Officer shall–

( a ) subject to the control, direction and supervision of the President, supervise the financial and executive administration of the Council and exercise such powers and perform such duties and functions as may be conferred or imposed upon him or allotted to him by or under this Act.'

यात मुख्य अधिकाऱ्याच्या सत्ता–वापरावर अध्यक्षाला नियंत्रण, निर्देशन व पर्यवेक्षणाचे अधिकार दिलेले आहेत. ह्याच अधिकारांचा उल्लेख कलम ५८ ( १ ) ( ड ) मध्येही आला आहे. परंतु तेथे पर्यवेक्षण व नियंत्रण हे दोनच शब्द असून निर्देशन हा महत्त्वाचा शब्द गळाला आहे. भाषेचा सैलपणा म्हणून त्याकडे दुर्लक्ष केले तरी प्रस्तुत कलमाच्या सुरवातीला अध्यक्षाच्या अधिकारांबाबत जी अट घातली आहे ती महत्त्वाची आहे. ही अट अशी —

'58 (i) Subject to the provisions of this Act and any rules and by-laws framed thereunder, the President of the Council shall—'... [ ( d ) exercise supervision and control ... etc. )

कलम ७७ व कलम ५८ ह्यातील वरील अटींचे एकत्र वाचन केले तर त्यातून असा अर्थ निघतो की महाराष्ट्र नगरपालिका कायद्याने किंवा कायद्याच्या अंतर्गत मुख्य अधिकाऱ्याला प्राप्त झालेले अधिकार तोच वापरील व कार्य करील (exercise power and functions ) परंतु ह्या अधिकारावर व कार्यावर नियंत्रण, निर्देशन व पर्यवेक्षण करण्याची सत्ता अध्यक्षाला राहील. मात्र अध्यक्षाची ही सत्ता प्रस्तुत कायद्याच्या व त्याखाली केलेल्या नियमांच्या मर्यादेत राहील.

ह्याचाच अर्थ असा की अध्यक्षाची उपरोक्त सत्ता अमर्याद नाही. ह्या तरतुदींवर भाष्य करताना श्री. डी. एच्. चौधरी म्हणतात, ' जर प्रस्तुत कलमात उल्लेखिलेले एखादे कार्य प्रस्तुत कायद्याच्या इतर तरतुदींनुसार, नियमानुसार किंवा उपनियमानुसार इतर अधिकाऱ्याने करावयाचे असेल किंवा इतर अधि-

* मराठवाडा विद्यापीठातर्फे दि. ३ व ४ मार्च १९६९ रोजी अंबाजोगाई येथे आयोजित केलेल्या ' नगरपालिका प्रशासन ' परिसंवादात वाचलेला निबंध.








काऱ्याकडे प्रदत्त असेल तर ते कार्य करण्याचा अधिकार अध्यक्षाला राहणार नाही. "[१]

सारांश, प्रस्तुत कायद्याने मुख्य अधिकाऱ्याला जागोजागी जे अधिकार दिलेले आहेत ते अध्यक्षाला वापरता येणार नाहीत, नियंत्रण, निर्देशन व पर्यवेक्षणाचे हे सामान्य स्वरूपाचे अधिकार आहेत. त्यामुळे त्यांचा संबंध धोरण ठरवून देण्याशी व त्या धोरणानुसार काम होते की नाही हे पाहण्याशी आहे. ज्या ठिकाणी निर्देशनाचे सामान्यत्व संपते व त्याला विशिष्ट स्वरूप येते त्या ठिकाणी अध्यक्ष मुख्य अधिकाऱ्याच्या प्रशासन कार्यात कायद्याला संमत नसलेला हस्तक्षेप करीत आहे असे समजावे.

भारतातील कायदेपद्धती ही इंग्लंडच्या कायदेपद्धतीवर आधारलेली असल्यामुळे कायद्याचा अर्थ लावण्याच्या ब्रिटिश तत्त्वांनुसारही वरील तरतुदींचा विचार करता येईल. उदाहरणार्थ, १९३० च्या गरीबीविषयक ( Poor Law ) कायद्याच्या १ ल्या कलमाने ब्रिटिश आरोग्यमंत्र्याला प्रस्तुत कायद्यातील तरतुदींना अनुसरून स्थानिक शासनसंस्थांच्या गरिबी-निवारण प्रशासनाच्या 'सर्व बाबतीत निर्देशन व नियंत्रणाचे अधिकार' दिलेले आहेत. ( Section I. 'The Minister of Health ... is, subject to the provisions of this Act, charged with the direction and control of all matters relating to the administration of relief ...' ) ह्यावर भाष्य करताना प्रख्यात ब्रिटिश कायदेपंडित सर डब्ल्यू आयव्हर जेनिंग्ज म्हणतात की मंत्र्यांचा वरील अधिकार मोठा असला तरी अमर्याद नाही. एकतर, प्रस्तुत कायद्यातील इतर तरतुदींनी तो मर्यादित झाला आहे; आणि दुसरे, सामान्य स्वरूपाच्या ह्या अधिकारामुळे मंत्र्याला जे विशिष्ट अधिकार इतर कलमांनी देण्यात आलेले आहेत त्यात मुळीच वाढ होत नाही. ही सामान्य तरतूद म्हणजे इतरत्र देण्यात आलेल्या विशिष्ट अधिकारांचे संकलित स्वरूप होय. ( 'The section quoted is a deduction from the existance of specific powers set out elsewhere in the Act.' )[२] हे तत्त्व महाराष्ट्र नगरपालिका कायद्यातील कलम ५८ व ७७ ला लागू केल्यास त्यामुळेही इतर कलमांनी मुख्य अधिकाऱ्याला कायद्याने दिलेल्या विशिष्ट अधिकारांत हस्तक्षेप करण्याचा अधिकार अध्यक्षाला प्राप्त होत नाही हेच सिद्ध होते.

कलम ५८ ( ड ) वर भाष्य करताना श्री. चौधरी यांनी हेच मत व्यक्त केले आहे. ते म्हणतात, "अधिकारी व नोकर यांवरील पर्यवेक्षण व नियंत्रणाचा अधिकार हा त्या त्या अधिकारी व नोकराला देण्यात आलेल्या कार्यकारी ( Executive ) अधिकाराहून भिन्न आहे. एखाद्या अधिकाऱ्याने किंवा नोकराने आपल्या कार्यकारी अधिकारात दिलेल्या आदेशात हस्तक्षेप करण्याचा अधिकार अध्यक्षाला नाही. "[३]

नगरपालिकाकायद्यात मुख्य अधिकाऱ्याचा स्पष्ट उल्लेख करून त्याला अधिकार देणारी जी विपुल कलमे आहेत, त्यांपैकी काही कलमांत त्याने विशिष्ट कार्य केलेच पाहिजे ह्या अर्थाने 'shall' ह्या क्रियापदाचा प्रयोग करण्यात आला आहे. [ उदा० कलमे – ४५ (१) (२) (३), ४८ (२), १०२ (२), ११५ (१), १५० (१) व १७९ (३) ]. तेव्हा अर्थातच ह्या बाबतीत तो फक्त कायद्याच्याच नियंत्रणाखाली आहे. इतरांचे नियंत्रण हे कायद्याला धरून असेल तर त्याची गरज नाही, व ते कायद्याच्या विरुद्ध असेल तर ते बंधनकारक नाही.

कित्येक कलमांनी मुख्य अधिकाऱ्याला अधिकार देतांना 'आपल्या विवेकानुसार', 'आपल्या मतानुसार', 'आपणास योग्य वाटल्यास', 'आपल्या दृष्टीप्रमाणे' इत्यादि प्रयोग केले आहेत. [ उदा० कलमे – १७९ ( ५ ), १९५ ( १ ) ( २ ) ( ३ ), १९८, २०२, २०३, २१०, २२४, २२५, २३४,

१. The Maharashtra Municipalities Act, 1965; Commentary by D. H. Chaudhari, Poona, 1966, p. 165.

२. Principles of Local Government Law ले. Sir W. Ivor Jennings, Uni. of London Press, 1948, पृ. २१८

३. श्री. डी. एच्. चौधरी, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. १६६.








२३६, ३३४ इ. ] यावरून हे सारे, मुख्य अधिकाऱ्याचे विवेकाधिकार (Discretionary powers) आहेत व त्याबाबतीत निर्वाचित पदाधिकाऱ्यांना किंवा सदस्यांना हस्तक्षेप करता येणार नाही हे अगदी स्पष्ट आहे. कलम १६५ मध्ये तर मुख्य अधिकाऱ्याशिवाय इतर कोणत्याही अधिकाऱ्याला वारंट स्थगित करता येणार नाही असे स्पष्टच म्हटले आहे.

वरील शिवाय काही कलमांत मुख्य अधिकाऱ्याला दिलेले अधिकार त्याने 'कौन्सिलच्या संमतीने' किंवा 'कौन्सिलच्या नियंत्रणाखाली' वापरावयाचे आहेत. [ उदा० कलमे– ९३(२) (सी), २०२, २६५ ते २०९, २११, २१९, २९६, ३०१ इ. ] अर्थात् ह्या ठिकाणी अध्यक्षाला नियंत्रणाचे अधिकार नाहीत हे उघड आहे.

वरील प्रकारची कलमे सोडून बाकीच्या कलमांनी मुख्य अधिकाऱ्याला दिलेल्या अधिकारांचे बाबतीत नियंत्रण, मार्गदर्शन व पर्यवेक्षणाचा अधिकार अध्यक्षाला आहे असे म्हणता येईल. परंतु तेथेही मुख्य अधिकाऱ्याने अधिकार वापरण्यापूर्वी अध्यक्षांचे मार्गदर्शन घेतले पाहिजे असे त्यांच्यावर बंधन नाही. मार्गदर्शनाचे अभावी त्याने आपल्या बुद्धीनुसार अधिकार वापरल्यास तो अवैध ठरूं शकत नाही.[१]

सारांश, मुख्य अधिकारी हा आपल्या प्रशासन कार्यात फार मोठ्या प्रमाणात स्वायत्त आहे. निर्वाचित पदाधिकारी व सदस्य यांनी सामान्यतः त्याच्या कार्यात हस्तक्षेप करू नये अशी कायद्याची भूमिका आहे.

नगरपालिकेच्या कार्यक्षेत्रातील अंमलबजावणीची विविध प्रकारची कामे कायद्याने मुख्य अधिकाऱ्याकडे सोपविली आहेत त्यावरून तो प्रमुख प्रशासनाधिकारी आहे हे स्पष्ट होते. तो आपली कामे अन्य अधिकारी व सेवक यांचेकडून करवून घेऊ शकतो [ कलम ७७ (२) ] यावरून ते सर्वजण मुख्य अधिकाऱ्याच्या हाताखाली काम करतात हे स्पष्ट होते. त्यांचेवर देखरेख व नियंत्रण ठेवण्याचा सामान्य अधिकार अध्यक्षांना देण्यात आला आहे [ कलम ५८ ( १ ) ( डी ) ] परंतु त्यांच्या दैनंदिन प्रशासनकार्यात हस्तक्षेप करण्याचा अधिकार कोणत्याही निर्वाचित पदाधिकाऱ्याला किंवा सदस्याला नाही.

नगरपालिकेतील कार्याचे प्रस्तुत कायद्याने तीन भाग स्पष्टपणे पाडलेले दिसतात.

१. धोरण व आर्थिक समायोजन ठरविणे;

२. धोरणानुसार अंमलबजावणी करण्यासाठी मार्गदर्शन करणे, देखरेख ठेवणे व नियंत्रण करणे. आणि

३. अमलबजावणी करणे.

पहिले कार्य– धोरण व आर्थिक समायोजन ठरविण्याचे– निर्वाचित सदस्य व पदाधिकाऱ्यांकडे सोपविण्यात आले आहे. परंतु हे कार्य व्यक्तिशः कोणाकडेही– अध्यक्षाकडे सुद्धा– देण्यात आलेले नाही. सामूहिकपणे कौन्सिल व समित्यांकडे ते सोपविण्यात आले आहे.

तिसरे कार्य– अंमलबजावणीचे– शासकवर्गाकडे देण्यात आले आहे. मुख्य अधिकारी हा त्यांतील प्रधान शासक आहे. फक्त काही अपवादात्मक परिस्थितीत हे कार्य अध्यक्षाकडे [ उदा. कलम ५८ ( २ ) ] किंवा राज्यशासनाच्या अधिकाऱ्यांकडे [ उदा., कलमे ३०९, ३१३ ] देण्यात आले आहे.

दुसरे कार्य– मार्गदर्शन, देखरेख व नियंत्रणाचे – हे पहिल्या व तिसऱ्या कार्यांचा सांधा साधणारे कार्य आहे. त्यामुळे निर्वाचित पदाधिकारी व अधिकारीवर्ग ह्या दोघांचेही हे कार्य आहे. वरिष्ठाने कनिष्ठाचे मार्गदर्शन व नियंत्रण करावे अशी ही योजना आहे. पदाधिकाऱ्यांव्यतिरिक्त इतर निर्वाचित सदस्यांना– विशेषतः समित्यांवरील सदस्यांना– हा अधिकार प्राप्त झाला आहे. मात्र त्यांचा हा अधिकार इतरांप्रमाणे व्यक्तिशः नसून सामूहिक आहे.

कोणत्याही लोकशाही शासनयंत्रणेत– मग ती केन्द्रीय असो, प्रांतीय असो की स्थानिक असो– असायला पाहिजे तशीच ही कामांची विभागणी आहे.

इंग्लंडमध्ये नगरपालिकांच्या कोणत्याही निर्वाचित सदस्याला शासनाधिकाऱ्यांच्या कामात हस्तक्षेप करण्याचा अधिकार नाही. नगरपालिकांचे अध्यक्ष म्हणजे मेयर यांनासुद्धा तेथे प्रशासनाचे अधिकार नाहीत. हे अधिकार सामूहिक रीतीने कौन्सिललाच आहेत.[२]

---

१. पाहा, श्री. डी. एन. चौधरी यांचा पूर्वोक्त ग्रंथ पृ. १९०.

२. Municipal Administration; ले. J. H. Warren; Pitman and Sons, London, 1954, पृ. १७९ व १८८.








अमेरिकेतदेखील नगरपालिकेच्या कौन्सिल-मॅनेजर शासनप्रकारात मेयरकडे राजकीय नेतृत्व आणि व्यवस्थापकाकडे (म्ह० मुख्य अधिकाऱ्याकडे) प्रशासकीय नेतृत्व अशीच वाटणी केलेली आढळते.[१] परंतु आपल्या देशातील काही स्थानिक नेत्यांना शासनाधिकाऱ्यांची प्रशासनविषयक स्वायत्तता ही लोकशाहीच्या कल्पनेशी विसंगत वाटते. लोकशाहीशासन म्हणजे लोकांनी निवडून दिलेल्या लोकांचे शासन; शासनाधिकारी म्हणजे लोकप्रतिनिधींच्या हातातील केवळ साधन; अतएव लोकप्रतिनिधींना त्यांचेवर संपूर्ण अधिकार असावेत यातच खरी लोकशाही आहे असे त्यांना वाटते.

परंतु लोकप्रतिनिधींच्या अधिकारांबद्दलची ही कल्पना लोकशाहीची नसून सरंजामशाहीची आहे: जुन्या वृत्तीचे सरंजामी लोक आपल्या नोकरांना आपल्या लहरीप्रमाणे राबवतात. 'अमूक कर– तमूक कर' असे आदेश सोडून त्यांचेकडून काम करवून घ्यायचे, वेळी–अवेळी त्याला केव्हाही बोलवावयाचे, त्याच्या नियत कामाव्यतिरिक्त आपली इतरही कामे त्याच्याकडून करवून घ्यायची, मर्जी होईल त्याला नेमावयाचे व मर्जी खफा झाली की काढून टाकावयाचे. अगदी अपुऱ्या वेतनावर त्याला गुजराण करायला लावावयाची आणि तरीही त्याचेकडून हात जोडून सदा मानसन्मानाची अपेक्षा करायची! भारतात नेतृत्वाबद्दलची पारंपरिक कल्पना ह्याच प्रकारची आहे. डी. एम्. ब्राऊन ह्या लेखकाने ह्याला 'प्राधिकारी' किंवा 'बहादुरी' नेतृत्व ('authority' or 'heroic' leadership) अशी संज्ञा दिली आहे.[२] नगरपालिकेच्या क्षेत्रात निर्वाचित पदाधिकाऱ्यांनी अधिकारी व सेवकवर्गावर वरील प्रकारे अधिकार गाजविण्याची एक अनिष्ट परंपरा निर्माण झाली आहे. त्याचा प्रशासनाच्या कार्यक्षमतेवरही अनिष्ट परिणाम झाला आहे.

परंतु वरील प्रकारचे 'बहादुरी' अधिकार हे खरे अधिकारच नव्हत. कोणत्याही कार्याचे मूलभूत नियंत्रण हे त्याचे धोरण व आर्थिक स्वरूप ठरविण्याने होत असते. धोरणावर व आर्थिक व्यवहारावर ज्याचे प्रभुत्व आहे तोच खरा सत्ताधारी होय. त्याला इतर सत्तांची गरजच नाही. मंत्रशक्ती व अर्थशक्ती मिळून सर्वश्रेष्ठ सत्ता होते. लोकशाही हे लोकांचे राज्य असल्यामुळे लोकप्रतिनिधींना नेमकी हीच सत्ता देण्यात येते. ह्या मूलभूत व सर्वव्यापी सत्तेचे महत्त्व कमी लेखून वरपांगी 'सरंजामी' किंवा 'बहादुरी' बडेजावालाच सत्ता मानणे म्हणजे सत्तेच्या स्वरूपाविषयी गैरसमज असणे होय.

लोकशाही प्रशासनात निर्वाचित सदस्यांना किंवा पदाधिकाऱ्यांना अंमलबजावणीविषयक अधिकार देणे जसे अनावश्यक आहे तसेच ते अनिष्टही आहे. लोकशाही प्रशासनात लोकांच्या इच्छा जाणून धोरण ठरवू शकणारे तज्ञ लोकप्रतिनिधी असतात; परंतु कोणत्याही धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी वेगळ्या तज्ञपणाची गरज असते. ते कार्य अनुभवी व कुशल प्रशासकच चांगल्या रीतीने करू शकतात व त्यांनीच ते करावयास पाहिजे. त्यात सदस्यांनी हस्तक्षेप करू नये.

आणि म्हणून आपल्या देशातील वरील 'सरंजामी' परंपरा लक्षात घेता अधिकारीवर्ग आपल्या कार्यात स्वायत्त राहू शकेल याची तरतूद करणे अत्यंत आवश्यक आहे.

प्रस्तुत कायद्यातील पुढील तरतुदींमुळे ही प्रशासकीय स्वायत्तता निर्माण होण्यास मदत झाली आहे.

१. मुख्य अधिकाऱ्याला स्वतः कायद्याने दिलेले विविध प्रकारचे व विपुल प्रमाणातील अधिकार.

२. बहुतेक[३] 'सर्व अधिकारी व सेवक यांच्या नियुक्तीचे दंडाचे व नियुक्तीचे अधिकार कोणत्याही व्यक्तीकडे न देता ते सामूहिकपणे कौन्सिल किंवा समितीकडे देणे. [ कलमे ७५ (४), ७६ (३) व

१. State and Local Government; ले. R. W. Maddox and R. F. Fequay; D. Van Nostard Co., New York, 1963; पृ. ४८१.

२. Leadership and Political Institutions in India; संपादक– R. L. Park and I. Tinker; Oxford Uni. Press, 1960, पृ. ९.

३. रु. ७५ पेक्षा कमी पगार असलेल्यांची नेमणूक करण्याचा अधिकार अध्यक्षाला कौन्सिल कलम ७६ (३) (अ) प्रमाणे देऊ शकते. तसेच कलम ७९ (६) मध्ये मुख्य अधिकाऱ्याचा दंड करू शकणारा अधिकारी

७९ (२) ] ह्या तरतुदींमुळे अधिकाऱ्यावर किंवा सेवकावर व्यक्तिगत दडपण येण्यास कमी वाव मिळतो, व नियमानुसार वागण्यास मदत होते.

३. सर्व प्रमुख अधिकाऱ्यांची पात्रता, पगार, भत्ते व इतर सेवानियम ठरविण्याचा अधिकार नगरपालिकांकडे न ठेवता राज्यशासनाकडे किंवा संचालकाकडे ठेवणे. [ कलमे ७५ (४) व ७६ (२) ], आजवरचा अनुभव असा की योग्य गुणवत्ता नसलेलेही लोक नगरपालिका प्रशासनात बऱ्याच प्रमाणांत नेमले जातात. असे लोक न्यूनगंडामुळे म्हणा किंवा मेहेरबानीवरच आपले पद अवलंबून आहे ह्या जाणिवेने म्हणा अधिकार असले तरी त्यांचा योग्य वापर करू शकत नाहीत. अपुरा पगार, असमाधानकारक सेवानियम व प्रतिष्ठेचा अभाव ह्यांमुळे सुयोग्य व्यक्ती नगरपालिकेतील सेवेकडे आकृष्टही होत नाहीत. भारतातील पूर्वीच्या स्थानिक शासनाचा एक दोष म्हणून श्री. टिंकर म्हणतात, " एकंदरित, पात्रता असलेली प्रामाणिक माणसे आकृष्ट होतील असे स्थानिक शासनसेवेच्या वरिष्ठ किंवा कनिष्ठ श्रेणीमध्ये काहीही नव्हते."[१] नगरपालिका सेविवर्गाच्या वर्तमान स्थितीची पाहणी करून भारत शासनाने नेमलेल्या समितीनेही असेच मत व्यक्त केले आहे. समितीच्या आपल्या अहवालातील ह्यासंबंधीचा आशय असा की– (अ) नगरपालिकांतील सेवेसाठी सुयोग्य गुणाधिष्ठित निवडपद्धती नाही; (ब) वेतनमान व सेवानियम सुयोग्य व्यक्तींना आकृष्ट करण्यासाठी समाधानकारक नाहीत; (क) केवळ सदस्यांची मते मोजून सेवकांना शिक्षा करणे किंवा काढून टाकणे ह्यामुळे सेवकांमध्ये असुरक्षितता व वशिलेबाजी निर्माण होते. सेवकात अनुशासन ठेवण्यास नगरपालिका असमर्थच आहे. (ड) असुरक्षितता, प्रतिष्ठेचा अभाव इ. कारणांमुळे योग्य सेवकवर्ग नगरपालिकांजवळ टिकत नाही. (इ) योग्य अधिकारीवर्ग मिळविणे बहुतेक नगरपालिकांच्या आवाक्याबाहेरचे काम झाले आहे.[२]

हे सर्व दोष दूर व्हावेत ह्यासाठी गुणवत्ता, वेतनमान, सेवानियम ह्यांबद्दलचे अधिकार प्रस्तुत कायद्याने राज्यशासनाला दिले आहेत.

४. मुख्य अधिकारी व अन्य प्रमुख अधिकारी यांची राज्यव्यापी श्रेणी ( State cadre ) तयार करणे. [ कलम ७५ ( ५ ) ]. ही अत्यंत महत्त्वाची तरतूद आहे. त्यामुळे अधिकाऱ्यांचे वेतनमान व सेवानियम सुधारतील, त्यांची प्रतिष्ठा वाढेल, योग्य पात्रतेच्या व्यक्ति आकृष्ट होतील व प्रशासनाचा दर्जा सुधारेल. एखाद्या नगरपालिकेला नको असलेल्या अधिकाऱ्याची बदली करून दोघांच्याही आपत्तींचे समाधानकारकपणे निवारण करता येईल. भारत शासनाच्या उपरोक्त समितीने पुढील निःसंदिग्ध शब्दात राज्यव्यापी श्रेणीची शिफारस केली आहे, 'समिती ह्या निश्चित निर्णयाप्रत आली आहे की नगरपालिकांच्या सेवकांच्या राज्यव्यापी श्रेणी बनविणे इष्ट आहे.'[३]

५. नगरपालिकेच्या समित्यांवर एकल संक्राम्य मतपद्धतीने सदस्यांची निवड करणे व कोणताही सदस्य दोन पेक्षा अधिक समित्यांवर असू न देणे. [ कलमे ६३ ( २ ) ( ब ) आणि ६३ ( ३ ) ]. ह्या तरतुदीमुळे समित्यांवर बहुसंख्य पक्षाबरोबरच विरोधी पक्षांचेही सदस्य संख्याप्रमाणात निवडून येतात. नगरपालिकेच्या विविध कामांचे तपशील ह्या समित्यांमध्ये ठरत असल्यामुळे विरोधी पक्षाच्या सदस्यांनाही कामांची अंतर्गत माहिती होते; व त्यांचा अधिकारारूढ पक्षावर अंकुश राहतो. ह्याचा अप्रत्यक्षपणे फायदा नगरपालिकेच्या अधिकाऱ्यांना व सेवकांना मिळतो व आपले

म्हणून उल्लेख आहे. परंतु तो कलम ७९ (२) मधील तत्त्वाशी विसंगत आहे. त्याचेऐवजी येथे अध्यक्षाचा उल्लेख पाहिजे.

१. The Foundations of Local Self-Government in India, Pakistan and Burma,; ले. Hugh Tinker, ( Uni. of London, 1954 ) पृ, ३२२.

२. Report of the Committee on the Service Conditions of Municipal Employees; Govt. of India; Ministry of Health, Family Planning and Urban Development, 1968; पृ. २६–२७.

३. उपरोक्त Report, पृ. ३२.








काम नियमानुसार, हस्तक्षेपाशिवाय करण्यास त्यांना वाव मिळतो.[१]

अधिकारी वर्गाची प्रशासकीय स्वायत्तता ह्याचा अर्थ त्यांना मर्जीप्रमाणे वागण्याची मुभा असा मात्र नव्हे. निर्वाचित सदस्य व पदाधिकारी यांच्या धोरण, आर्थिक समायोजन, मार्गदर्शन देखरेख, नियंत्रण व शिक्षा ह्या अधिकारांमुळे अधिकारीवर्गाच्या संभाव्य स्वैरतेवर सर्वबाजूंनी मर्यादा पडत असतात. त्याच्या अंमलबजावणीच्या कार्यक्षेत्रावर आतून बाहेरून व सर्व बाजूनी मर्यादांची कितीतरी वलये असतात.

ह्या सर्व मर्यादांमुळे त्याला नियमांच्या चाकोरीतूनच जावे लागते. विशेष दडपण आल्याशिवाय किंवा विशेष पाठिंबा असल्याशिवाय नियमाबाहेर जाण्यास तो सहसा धजणार नाही.

असे विशेष दडपण येऊ नये किंवा विशेष पाठिंबा मिळू नये म्हणून प्रस्तुत कायद्यातील उपरोक्त पाच तरतुदींचे विशेष महत्त्व आहे.

परंतु कोणत्याही मानवी संस्थेचे स्वरूप केवळ कायद्यातील तरतुदी पाहून पूर्णपणे स्पष्ट होत नाही. कायद्याव्यतिरिक्त अनेक शक्ती तेथे कार्य करीत असतात व केव्हा केव्हा तर कायद्यापेक्षा त्यांचाच प्रभाव अधिक होतो. नगरपालिकांचे निर्वाचित सदस्य व पदाधिकारी आणि नियुक्त अधिकारी व सेवक यांच्या संबंधांनाही हा नियम लागू आहे.

कायद्याने कामाची कितीही काटेकोरपणे व यथायोग्य विभागणी केलेली असली तरी प्रत्यक्षात धोरण व अंमलबजावणी यांची पूर्णपणे फारकत करता येत नाही. त्यामुळे ह्या दोन क्षेत्रात काम करणारांना एकमेकांच्या कामात हस्तक्षेप करण्यास वाव राहतोच. त्यांच्या व्यक्तिगत गुणावगुणांवर व स्वभावविशेषांवरही त्यांचे संबंध अवलंबून असतात. तसेच, कायद्याने कितीही सरक्षण दिलेले असले तरी अखेरीस अधिकारी वर्गाला रोज निर्वाचित सदस्य व पदाधिकारी यांच्यातच वावरावे लागते. त्याच्या भवितव्याच्या अनेक लहान मोठ्या गोष्टी त्यांच्या हाती असतात. त्यांच्याशी फटकून राहणे कोणत्याही सामान्य अधिकाऱ्याला परवडणारे नसते. निर्वाचित पदाधिकाऱ्यांना खालून बहुमताचा पाठिंबा असतो व वरून प्रांतिक शासनाकडूनही ( तेही निर्वाचित सदस्यांचे असल्यामुळे ) संरक्षण मिळण्याचाच अधिक संभव असतो. अशा स्थितीत नगरपालिकेचे अधिकारी सामान्यतः निर्वाचित पदाधिकाऱ्यांच्या कलानेच चालतात. ते आपला विरोध व्यक्त करण्यास किंवा नोंदविण्यास धजत नाहीत, वरिष्ठांनी सुचविलेल्या अयोग्य वर्तनासाठी कायद्यातील पळवाटा शोधून काढतात व पुढेमागे स्वतःवर विशेष बेतणार नसेल तर नियमबाह्य वर्तनातही सहभागी होतात. अशा व्यवहारांत वरिष्ठांचे कनिष्ठांना मिळणारे आदेश हे लेखी नसून तोंडी स्वरूपाचे असतात.

नगरपालिकांचा आजवरचा सध्याचाही कारभार फार मोठ्या प्रमाणात वरीलप्रमाणे चालतो असा त्यावर आरोप आहे. लोकशाही कार्यपद्धतीच्या योग्य परंपरांचा अभाव व लोकशाही नेतृत्वाबद्दलच्या विकृत कल्पना यांतून ही परिस्थिती निर्माण झाली आहे. इंग्लंड आणि भारत यांतील नगरपालिकांच्या कारभारांचे तौलनिक विवेचन करताना श्री. टिंकर म्हणतात की भारतात आहेत तसेच कित्येक दोष इंग्लंडच्या स्थानिक प्रशासनातही आहेत, त्यांपैकी काही तर लोकशाही शासनाच्या किंमतीचा भाग आहेत; तरीदेखील भारतातील स्थानिक शासन अयशस्वी झाले आहे व इंग्लंडमधील स्थानिक शासन यशस्वी झाले आहे ह्याचे एक मुख्य कारण म्हणजे तेथे लोकशाही कार्यपद्धतीच्या योग्य परंपरा निर्माण झाल्या आहेत. त्यामुळे अधिकाऱ्यांचे 'तांत्रिक' ज्ञान व पदाधिकाऱ्यांचे 'स्थानिक' ज्ञान यांचा योग्य समन्वय तेथे घातला जातो. तसेच बहुतेक बरो व कौंटी कौन्सिल मध्ये एखादी तरी अशी क्रान्तदर्शी व प्रभावी व्यक्ति असतेच की तिच्यामुळे त्या स्थानिकशासनाच्या कार्याला योग्य दिशा मिळते. भारतामध्ये नेमका ह्याच गोष्टींचा अभाव आहे.[२] निर्वाचित सदस्य व पदाधिकारी आणि नियुक्त अधिकारी व सेवक यांच्या प्रशिक्षणाने हळूहळू ही परिस्थिती सुधारू शकेल. मात्र संबंधित व्यक्तींमध्ये स्थानिक शासनाबद्दल मूलभूत निष्ठा पाहिजे.

१. जुन्या कायद्यानुसार विरोधी सदस्यांना कारभाराच्या अंतर्गत दालनात जवळजवळ प्रवेश नसे. त्यामुळे त्यांना विनोदाने 'व्हरांडा मेंबर' हे नाव मिळाले होते.

२. Hugh Tinker, पूर्वोक्त ग्रंथ, पृ ५ ते ७.



अनुक्रमणिका






स्थानिक शासनाविषयी जर निष्ठा नसेल तर निर्वाचित सदस्य व पदाधिकारी आणि नियुक्त अधिकारी व सेवक यांच्यामध्ये अगदीच वेगळया प्रकारचे संबंध निर्माण होऊ शकतात. एकमेकांचा स्वार्थ हा ह्या संबंधाचा आधार व हेतू असतो. जनसेवेच्या बाह्य देखाव्यामागे पद्धतशीरपणे आत्मसेवेचा धंदा चालू होतो. अशा ठिकाणी संबंधित असलेले निर्वाचित सदस्य व पदाधिकारी आणि नियुक्त अधिकारी व सेवक यांचे संबंध साथीदारांचे असतात. अशा प्रकारचा भ्रष्टाचार नगरपालिकेच्या कारभारात कितपत चालतो हे सांगणे कठिण आहे. परंतु सध्या देशात सर्वच क्षेत्रात 'भ्रष्टाचार हा शिष्टाचार झाला आहे' असे श्री. विनोबा भाव्यांसारखे श्रेष्ठ लोक म्हणतात. श्री. टिंकर सारखे अभ्यासक म्हणतात की, 'सार्वजनिक पदावर (मग ते लहान असो की मोठे) असलेल्या व्यक्तीने आपल्या सार्वजनिक कामातून व्यक्तिगत लाभ करून घेण्यात भारतीय परंपरागत दृष्टिकोनाला काहीच गैर वाटत नाही. ... कामाच्या बक्षिसाचे प्रमाण प्रथेने ठरून गेलेले असते. ... (तसेच) नेमणुका करताना नेमणुकअधिकारी प्रथम आपल्या कौटुंबिक आप्तांची, नंतर आपल्या जातीतील किंवा समाजातील व्यक्तींची नेमणूक करतो. असे जो करणार नाही त्याचे ते वर्तन अस्वाभाविकच नव्हे तर (आपल्या कुल–जात–समाजाशी) कृतघ्नपणाचे मानले जाते. ... हा भ्रष्टाचार मर्यादेबाहेर गेला तर त्यामुळे काहीसा लोकक्षोभ होतो. परंतु भारतीय लोक हे फारच शांत वृत्तीचे आहेत व 'सरकार मायबाप आहे' अशी त्यांची धारणा आहे.'[१] ही धारणा आता पूर्वीइतकी नसली तरी अद्याप जनता पुरेशी जागरूक झाली नाही व त्यामुळे भ्रष्टाचाराला बराच वाव मिळतो असे म्हणावे लागेल.

वरील विवेचनाचा हेतू निर्वाचित सदस्य व पदाधिकारी आणि नियुक्त अधिकारी व सेवक यांचे व्यवहार अगदी सैद्धांतिक पातळीप्रमाणे आदर्श स्वरूपाचेच असले पाहिजेत हे प्रतिपादन करण्याचा नाही. ते व्यवहार आदर्शापर्यंत जितके जाऊ शकतील तितके चांगलेच. परंतु मानवी व्यवहारात आदर्श परिस्थिति क्वचितच आढळते. निरपेक्ष जनसेवेचे आदर्श ध्येय डोळयासमोर ठेवून नगरपालिकातील निवडणुका लढविणारे आदर्श कार्यकर्ते विरळाच. तसेच त्यांच्याकडे निव्वळ स्वार्थाचा धंदा म्हणून पहाणारेही विरळाच. निवडणुका लढविणारे सामान्यतः कोणकोणत्या भावनांनी प्रेरित झालेले असतात यांची श्री. वारेन यांनी पुढीलप्रमाणे यादी दिली आहे– १. निःस्वार्थी जनसेवा. २. स्वार्थदृष्टि. ३. काही विद्यमान परिस्थितीविरुद्ध निषेध नोंदविणे. ४. काही विद्यमान परिस्थितीचे समर्थन करणे. ५. विशिष्ट कामाची गोडी. ६. प्रसिद्धीची आवड. ७. मानसन्मानाची किंवा प्रतिष्ठेची इच्छा. ८. सत्तेची इच्छा.[२]

सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या मनात वरील प्रकारच्या महत्त्वाकांक्षा असणे यात गैर काहीही नाही. नगरपालिकेच्या कार्यावर त्यांचा अनिष्ट परिणाम होणार नाही अशा रीतीने ह्या महत्त्वाकांक्षांची पूर्ती होऊ देणे व शक्य झाल्यास त्यांना विधायक वळण देणे हे व्हावयास पाहिजे. आणि ह्याबाबतीत नगरपालिकेच्या अधिकारीवर्गाची विशेष जबाबदारी आहे.

अधिकारीवर्गात जे खरोखर तज्ञ, प्रामाणिक व कुशल अधिकारी असतात त्यांच्यामध्ये पुष्कळदा एकप्रकारचा अहंगंड निर्माण होतो. 'निवडून आलेल्या सदस्यांना काय समजते?' असे त्यांना वाटते. त्यांच्या वरील प्रकारच्या महत्त्वाकांक्षा क्षुद्र होत व त्या भ्रष्टाचाराचाच एक प्रकार होत अशी त्यांची धारणा असते. ह्यामुळे दोघांच्यामध्ये अविश्वासाचे वातावरण निर्माण होते. निर्वाचित सदस्य हे जनमतानुसार धोरण ठरविण्यात तज्ञ आहेत हे अधिकारीवर्गाने ओळखले पाहिजे. तसेच वरील प्रकारच्या त्यांच्या महत्त्वाकांक्षांची पूर्ती नगरपालिकेच्या कामात बाधा येणार नाही उलट शक्यतोवर त्यांना विधायक वळण मिळेल अशा रीतीने होऊ देण्याची दृष्टि अधिकाऱ्यांनी ठेवावयास पाहिजे.

नगरपालिकांचे निर्वाचित सदस्य व पदाधिकारी आणि नियुक्त अधिकारी व सेवक यांच्या संबंधांचे विवेचन येथवर करण्यात आले आहे. परंतु ह्यांच्याव्यतिरिक्त आणखी एका अधिकारीवर्गाशी निर्वाचित सदस्य व पदाधिकारी यांचा संबंध येत असतो. हा वर्ग

१. ह्यू टिंकर, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. १०–११
२. J. H. Warren ; पूर्वोक्त ग्रंथ, पृ. १७७.






म्हणजे राज्यशासनाचा अधिकारीवर्ग. प्रस्तुत नगरपालिका कायद्यानुसार त्याचे पुढील प्रकार आहेत:—

१. राज्यशासन म्हणून काम पहाणारे सचिवालयीन अधिकारी.

२. संचालक (डायरेक्टर) व त्याच्या हाताखालील अधिकारी.

३. जिल्हाधीश (कलेक्टर) व त्याच्या हाताखालील अधिकारी.

४. राज्यशासनाने विशिष्ट कामांसाठी नेमलेले अधिकारी.

प्रस्तुत नगरपालिका कायद्याने प्रशासकीय स्वायत्तता निर्माण करून आणि इतर अनेक बाबतीत तपशीलवार नियम देऊन आधीच निर्वाचित सदस्यांचे व पदाधिकाऱ्यांचे अधिकार मर्यादित केले आहेत. त्यांतूनही जे काही अधिकार त्यांचेकडे उरले असते त्यांच्याबाबतीतही वरील शासकीय अधिकाऱ्यांना इतके काही अधिकार देण्यात आले आहेत की त्यांतून निर्वाचित सदस्यांचे व पदाधिकाऱ्यांचे निखालसपणे स्वतःचे असे जवळ जवळ कोणतेही अधिकार शिल्लक राहात नाहीत. ह्या कायद्याच्या पानोपानी शासकीय अधिकाऱ्यांच्या वरिष्ठ अधिकारांची मुक्तपणे पखरण झालेली दिसते. राज्यशासनाला नियम बनविण्याचे अधिकार आहेत (कलम ३२१). तसेच आदर्श उपनियम बनविण्याचेही अधिकार आहेत. (कलम ३२३). करनिर्धारण (कलम १०५), फेरतपासणी (कलम ३१८), सेवाविषयक नियम व राज्यव्यापी श्रेणी (कलम ७५) इ० अधिकार तर आहेतच पण कोंडवाड्यातील रजिस्टर कसे ठेवावे हे सांगण्याचाही अधिकार आहे. (कलम २८४). संचालकाच्या पूर्वसंमतीची गरज तर पदोपदी निर्माण होते; मग ते उपनियम बनविणे असो (कलम ७१), नवीन सेवापदे निर्माण करणे असो (कलम ७५) की अंदाजपत्रक बनविणे असो. [कलम १०१ (४)]. एवढेच काय, जिल्हाधीशालादेखील नगरपालिकेचे बाबतीत विपुल अधिकार देण्यात आले आहेत. नगरपालिकेच्या संपूर्ण कार्याचे निरीक्षण व पर्यवेक्षण करण्याचा त्याला अधिकार आहे. (कलम ३०७). तेथील निवडणुकीचे नियंत्रण तोच करतो. (कलमे १९, ५१ इ.) सदस्यत्वासाठी एखादा सदस्य अपात्र झाल्याचाही निर्णय तोच घेतो. [कलम ४४ (३)]. नगरपालिकेने घेतलेला कोणताही निर्णय किंवा सुरू केलेले कार्य तो स्थगित करू शकतो. (कलम ३०८) तसेच प्रसंगविशेषी एखादे कार्य तो करवूनही घेऊ शकतो. (कलम ३०९). मृत देहांची वासलात लावण्याकरिता स्मशानभूमी निर्धारित करण्यासाठी आणि कत्तलखान्यांना परवानगी देण्यासाठी सुद्धा नगरपालिकेला जिल्हाधीशाची संमती घ्यावी लागते. (कलम २५२ व २६८). ह्या अधिकारांचा अधिक तपशील न देता येवढे म्हणणे पुरेसे आहे की शासकीय अधिकाऱ्यांच्या अधिकारांनी नगरपालिकांचे निर्वाचित सदस्य व पदाधिकारी जवळ जवळ सर्व बाजूंनी सर्वतोपरि नियंत्रित झाले आहेत.

ह्या ठिकाणी साहजिकच प्रश्न निर्माण होतो की लोकशाही विकेन्द्रीकरणाच्या ह्या काळात हे नियंत्रण कसे काय समर्थनीय समजावे? हा स्थानिक शासनाच्या लोकशाही प्रक्रियेवरील अविश्वास समजावा की स्थानिक शासनातील लोकांवरील अविश्वास समजावा? ज्यांनी जुन्या कायद्याचे अंतर्गत स्वायत्तता उपभोगिली अशा कित्येक सार्वजनिक कार्यकर्त्यांना— विशेषतः अध्यक्षपदाचे अधिकार गाजविलेल्यांना— प्रस्तुत कायदा लोकशाही विकासाच्या दृष्टीने अत्यंत प्रतिगामी स्वरूपाचा वाटतो.

प्रस्तुत कायद्याने नगरपालिकांच्या अधिकारांवर राज्यशासनाचे विस्तृत प्रमाणात नियंत्रण निर्माण केले आहे ही गोष्ट स्पष्टच आहे. तथापि यातून दृग्गोचर होणाऱ्या आरोपाची तीव्रता कमी करणारे काही महत्त्वाचे मुद्देही लक्षात घेतले पाहिजेत. एकतर, राज्यशासनाचे बहुंशी अधिकार सामान्यस्वरूपाच्या मार्गदर्शनाचे (नियम, आदर्श उपनियम इ. बनविणे) किंवा संमती देण्याचे (म्हणजे कार्य यथायोग्य आहे की नाही ह्यावर देखरेख ठेवण्याचे) आहे. त्यामुळे नगरपालिकांच्या अधिकारांच्या योग्य वापरावर कोणतेही बंधन येत नाही. दुसरे असे की राज्यशासन हेही अंशतः लोकप्रतिनिधींचेच शासन आहे. त्यामुळे त्याचा नियंत्रणाचा अधिकार लोकशाही दृष्टीने देखील समर्थनीय आहे इतकेच नव्हे तर शासकीय अधिकारी व नगरपालिकांचे सदस्य किंवा पदाधिकारी यांच्यात संघर्ष निर्माण झालाच तर राज्यशासनातील वरिष्ठ लोकप्रतिनिधी नगरपालिकांतील लोकप्रतिनिधींनाच पाठिंबा देण्याचा संभव अधिक. त्यामुळे विशेष








कारणांशिवाय राज्यशासनाचे अधिकारी नगरपालिकांच्या कामात हस्तक्षेप करणे संभवत नाही. आणि तिसरा आणि महत्त्वाचा मुद्दा हा की आजच्या बदललेल्या गरजा लक्षात घेता केवळ स्थानिक समजल्या जाणाऱ्या कार्यांमध्ये सुद्धा केंद्रीय नियोजन, संचालन, नियंत्रण इत्यादींची आवश्यकता निर्माण झाली आहे. हा एक आजचा भारतीयच नव्हे तर जागतिक प्रवाह आहे.

उदाहरणार्थ, इंग्लंडमध्ये मध्यवर्तीशासन खालील प्रकारे स्थानिकशासनावर नियंत्रण ठेवते:–[१]

१ सामान्य आदेश, अनुमती इ. देणे; नियम बनविणे.

२. स्थानिक संस्थांच्या अधिकाऱ्यांचे बाबतीत नियंत्रण. त्यांची पात्रता; सेवानियम इ. ठरविणे; सामान्य श्रेणी बनविणे; काही विशिष्ट नेमणुका करण्यास स्थानिक संस्थांना बाध्य करणे.

३. शासकीय अधिकाऱ्यांकडून कार्याची पाहणी करविणे.

४. स्थानिक शासनाच्या उपनियमांना तसेच विशिष्ट योजनांना संमती देणे,

५. हिशेबतपासणी,

६. अनुदानासंबंधी नियंत्रण.

७. कर्जविषयक नियंत्रण.

८. शासनाचे पुनर्निर्णयविषयक अधिकार.

९. स्थानिक शासनाने कार्य न केल्यास स्वतः करवून घेणे.

१०. कायदेविषयक अधिकार.

अमेरिकेसारख्या देशातसुद्धा स्थानिक शासनावरील राज्यशासनाचे नियंत्रण वाढत आहे. श्री. मॅडोक्झ व श्री. फूके म्हणतात, 'नगरपालिकांसहित सर्व स्थानिक शासनांवर (अमेरिकेतील) राज्ये प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष मर्यादा लादतात.' उदाहरणार्थ १. स्थानिक शासनाच्या पदांवर नेमणुका करणे. २. नगरपालिकांच्या सरहद्दी बदलणे. ३. बांधकाम योजनांना मान्यता देणे. ४. नवीन करांना अनुमती देणे. ५ रोखे काढण्यास संमती देणे[२] हेच लेखक पुढे म्हणतात, अमेरिकेत 'प्रमुख सेवांचे बाबतीत अधिक कार्यक्षम व सारख्या प्रशासनाची मागणी वाढत आहे.' त्यामुळे शिक्षण समाजकल्याण, वाहतुक, अर्थव्यवस्था इ. बाबतीत स्थानिक शासनावर राज्यशासनाचे नियंत्रण निर्माण झाले आहे. ह्या नियंत्रणाच्या पद्धती पुढील प्रमाणे आहेत: '(१) सल्ला आणि माहिती. (२) प्रतिवेदन. (३) आर्थिक साहाय्य. (४) प्रमाणे व पाहणी. (५) फेरविचार व संमती. (६) स्थानिक अधिकाऱ्यांची नियुक्ती व विमुक्ती आणि (७) मार्गदर्शन[२]

सारांश, व्यापक नियोजन, अधिक कार्यक्षम संचालन, कुशल व्यवस्थापन इ. उद्दिष्टांसाठी स्थानिक शासनांची स्वायत्तता आता संपुष्टात येऊ लागली आहे.

परंतु वरील सर्व बाबी लक्षात घेतल्यानंतरही प्रस्तुत कायद्याचे बाबतीत हा विचार शिल्लक राहतोच की तरीदेखील ह्या कायद्याने राज्यशासनाचे स्थानिकशासनावर बरेच नियंत्रण निर्माण केले आहे असे का ? ह्या संबंधी जागतिक कारणे न शोधता विशिष्ट भारतीय परिस्थितीच लक्षात घ्यावी लागेल.

भारतामध्ये स्थानिक शासनाच्या आदर्श परंपरा अगदी प्राचीन काळापासून ब्रिटिश अमदानीपर्यंत टिकून होत्या. ब्रिटिशांच्या केन्द्रिय शासनाच्या धोरणामुळे ह्या परंपरा नष्ट झाल्या. परंतु ब्रिटिश अमदानीत सुद्धा रिपनच्या कारकीर्दीत इंग्लंडमध्ये आधुनिक प्रातिनिधिक स्थानिक शासनप्रणाली निर्माण होण्याच्या किती तरी वर्षे अगोदर ती भारतात निर्माण करण्यात आली.[३] लोकप्रतिनिधींना अधिकार देण्याने शासनाचा स्तर घसरतो असे दिसून येऊ लागले. परंतु स्थूलपणे ब्रिटिश शासनाने धोरण असे ठेवले की स्थानिक शासन हे लोकशिक्षणाचे साधन असल्यामुळे त्यामुळे सुरवातीला शासनाचा स्तर हा कमी होणारच; लोक चुका करतील, पण हळूहळू चुका करीतच ते शिकत जातील; म्हणून त्यांच्यावर अनावश्यक शासकीय

१. W. I. Jennings, पूर्वोक्त ग्रंथ, प्रकरण ८ वे; पृ. २१७–२६०.

२. R. W. Maddox and R. F. Fuguay, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ४६४–४६६, ५७३ व ५७५.

३. Hugh Tinker, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ३३४.



अनुक्रमणिका






नियंत्रण लादू नये.[१] ह्या धोरणानुसार आणि भारतीयांच्या आंदोलनामुळे ब्रिटिश अमदानीत सुद्धा स्थानिक शासनसंस्थांच्या अधिकारांत वाढ होत गेली.

ब्रिटिशांनी स्थानिक शासनसंस्थांना पूर्ण स्वायत्तता कधीच दिली नाही. परंतु जी काही दिली तिचाही भारतीयांना पुरेपूर उपयोग करता आला नाही. ह्याबद्दल सामान्यतः ब्रिटिश नोकरशाहीला दोष दिला जातो. परंतु श्री. टिंकर सारखा अभ्यासक ब्रिटिश नोकरशाहीबरोबरच भारतीय नेतृत्वालाही दोष देतो. ब्रिटिश अमदानीत स्थानिकशासनाचा प्रयोग अयशस्वी झाला ह्याची कारणमीमांसा करताना श्री. टिंकर म्हणतात, "तर मग (अपयशासंबंधीचे) प्रमुख निष्कर्ष कोणते ? . . . . ते हे की हे अपयश ब्रिटिश व भारतीय नेतृत्व कमी पडल्यामुळे आले. . . . . हे खरे की ब्रिटिश शासनात रिपन होते व भारतीय जनतेत गोखले होते; परंतु ह्या दोहोंसारख्या अगदी थोडया लोकांनी केलेले प्रयत्न वगळता ब्रिटिश नोकरशाहीकडून किंवा भारतीय नेत्यांकडून स्थानिक शासनाने दिलेल्या आह्वानाला योग्य प्रतिसाद मिळाला नाही."[२] योग्य नेतृत्वामुळे इंग्लंडमधील स्थानिक शासन यशस्वी झाले व त्या अभावी भारतातील स्थानिक शासन –आधी निर्माण होऊनही– अयशस्वी झाले.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर स्थानिक शासनात बऱ्याच सुधारणा करण्यात आल्या. 'लोकशाहीतील दोषांवर उपाय म्हणजे अधिक लोकशाही' ह्या सूत्रानुसार लोकप्रतिनिधींचे अधिकार वाढविण्यात आले. परंतु गेल्या वीस–बावीस वर्षात–काही सन्मान्य अपवाद वगळता– स्थानिक शासनाचा स्तर सुधारलेला आढळत नाही. लोक चुका करीत करीत शिकतील ही अपेक्षा होती; परंतु लोक सामान्यतः चुकाच करीत गेले, शिकले मात्र फारच कमी. नगरपालिकातील सेवास्थितीबद्दल पाहणी करण्याकरिता भारतशासनाने नेमलेल्या समितीने १९६७ मध्ये सादर केलेल्या अहवालातील पुढील मत पुरेसे बोलके आहे. ह्या अहवालात समिती म्हणते– "There is general discontent and frustration over the performance of our urban local authorities, and the image of Municipal Administration in the public mind is that of inefficiency, nepotism and corruption."[३]

जवळजवळ ७५ वर्षांच्या अनुभवाची जर ही निष्पत्ती आहे तर स्वायत्ततेने नगरपालिकांचा कारभार सुधारेल ह्या कल्पनेला मुरड घातली पाहिजे. लोकशाहीच्या ह्या प्राथमिक पाठशाळेतील विद्यार्थी स्वतः होऊन शिकतील ही आशा आता फोल ठरत आहे. इतर पाठशाळांतील विद्यार्थ्यांप्रमाणे त्यांनाही शिक्षकाची गरज आहे. हे शिक्षकाचे कार्य प्रस्तुत कायद्याप्रमाणे राज्यशासनाने करावयाचे आहे. परंतु ह्यामुळे राज्यशासनाच्या अधिकारीवर्गावर फार मोठी जबाबदारी येऊन पडली आहे. प्रा. लास्की यांचे असे एक वचन आहे की कार्यक्षम व अकार्यक्षम प्रशासन यांतील सारा फरक निर्वाचित प्रतिनिधी (त्यांच्या हाताखालच्या) अधिकारी वर्गाचा सर्जनशील उपयोग कसा करून घेतात यात आहे. भारतातील सध्याची परिस्थिती लक्षात घेऊन व प्रस्तुत नगरपालिका कायद्यातील तरतुदी पाहता वरील वचनात बदल करून आपणास असे म्हणता येईल की आता कार्यक्षम व अकार्यक्षम प्रशासन यातील सारा फरक निर्वाचित प्रतिनिधींचा (त्यांच्या वरचा) अधिकारीवर्ग (म्ह. प्रांतिक स्तरावरील मंत्री, कायदेमंडळाचे सदस्य व सरकारी अधिकारी) सर्जनशील उपयोग कसा करून घेतात यावर अवलंबून आहे.

हा नवीन प्रयोग कितपत यशस्वी होईल हे आजच सांगणे अशक्य आहे. परंतु जुना प्रयोग फारसा यशस्वी न ठरल्यामुळे ह्या नवीन प्रयोगाला पुरेशी संधी देणे योग्य होईल.

---

१. १८ मे १९१८ चा भारतशासनाचा ठराव. पाहा– Report of the Committee on Democratic Decentralisation, Govt. of Maharashtra 1961;

२. Hugh Tinker, पूर्वोक्त ग्रंथ, पृ. ३३३

३. Report of the Committee on the service Conditions of Municipal Employees, Govt. of India, 1968, पृ. २४.








डॉ. यू. म. पठाण

# एक महानुभाव अर्जदास्त

जयदेववाडी ( जाळीचा देव ) जवळील घुम्मी या गावी राहणाऱ्या सुंदराबाई गुरु दामोदरबुवा ( महानुभाव ) यांच्या संग्रही असलेली एक महत्त्वपूर्ण पोथी नुकतीच पाहिली. या पोथीचा आकार ५½" × ३½" असा असून ती सुस्थितीत आहे. प्रतलेखकाचे हस्ताक्षर सुस्पष्ट असून पोथी जुन्या दौलताबादी कागदावर लिहिली आहे.

पोथीचा बराच भाग नवरसनारायणविरचित शल्यपर्वाने व्यापला आहे. प्रस्तुत शल्यपर्व मी यापूर्वीच इ. स. १९६४ मध्ये संपादून प्रसिद्ध केले आहे. शल्यपर्वाचे सर्व ( अठरा ) प्रसंग सदर हस्तलिखितात आढळतात. त्यानंतरच्या १२ पृष्ठांमध्ये एक 'अर्जदास्त' लिहिला आहे. त्यानंतर ' सकळी ' ( सांकेतिक ) लिपीमध्ये लिहिलेली भक्तिपर स्फुट रचना पुढील ४ पृष्ठात आढळते. अर्जदास्त वा शल्यपर्व मात्र सांकेतिक लिपीत लिहिलेले नाहीं.

एकनाथांनी जी उपदेशपर रूपके लिहिली, त्यात त्यांच्या ' अर्जदास्ता 'स महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. किंबहुना 'अर्जदास्त' म्हटल्याबरोबर एकनाथांचेच स्मरण होते. सदर पोथीत ' अर्जदास्त ' असल्याचे पाहून विशेष आश्चर्य वाटले. कारण ही पोथी एका महानुभाव साम्प्रदायिकाकडून मिळाली व महानुभाव संप्रदायाच्या पोथ्यांमध्ये अन्य सम्प्रदायाच्या कवींच्या वा लेखकांच्या रचना लिहिल्याचे आढळत नाही. ( अन्य साम्प्रदायिकांच्या हस्तलिखितांतही महानुभावीयांच्या रचना आढळत नाहीत, हे सांगण्याची आवश्यकता नाही. ) प्रस्तुत अर्जदास्ताच्या आरंभी महानुभाव कवी नवरसनारायण याची रचना व नंतर सांकेतिक (सकळी) लिपीतील भक्तिपर रचना– इत्यादि गोष्टी लक्षात घेता हे हस्तलिखित महानुभावीयांचे आहे; याबाबत दुमत होण्याचे काहीच कारण नाही.

सदर अर्जदास्तात व एकनाथविरचित अर्जदास्तात कितीतरी साम्य असल्याचे आढळते. जीवाने परमेश्वरास लिहिलेले पत्र– ही एकनाथविरचित अर्जदास्तामागील कल्पना आहे. जीव या पृथ्वीवर येतो, षड्रिपूंमुळे तो ग्रस्त होतो, तो भक्तीची वाट चोखाळत नाही व मृत्यू समीप आल्यावर त्याला पश्चात्ताप होतो, हा विचार सांगून नाथांनी एक प्रकारचा उद्बोधनाचा, समाजाला अध्यात्मप्रवण करण्याचा, प्रयत्न केला आहे. अशा प्रकारची किती तरी पत्रात्मक भारुडे नाथांनी लिहिली आहेत. आशीर्वादपत्र, विनंतीपत्र, अभयपत्र, अर्ज, अर्जदास्त. अर्जीचा जाब, अभयपत्र, ताकीदपत्र, जाबचिठी, कउलपत्र इत्यादि कितीतरी रचनांचा या संदर्भात उल्लेख करता येईल.

प्रस्तुत महानुभाव भारुडाचे स्वरूपही अशाच प्रकारचे आहे. महानुभाव साहित्यात अशा प्रकारची स्फुट रचना फारशी उपलब्ध होत नाही, आणि म्हणूनच प्रस्तुत भारुडास एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान प्राप्त होते. नाथांनी अशा स्वरूपाचे जे लेखन केले आहे, त्यावर नाथांचा असा जो ठसा आहे, तो या महानुभाव भारुडात जाणवल्याविना राहत नाही. त्यांच्या अर्जदास्तात वावरणाऱ्या मनीराम देसमुख, जिवाजी शेकदार, जरासंध चोपदार, ममताई देशपांडी या व्यक्ती प्रस्तुत अर्जदास्तात अनुक्रमे मनीराम देसमुख किंवा मनजी देसाई, प्राननाथ सेगदार, जरासंद चोपदार आणि ममताई देसमुकीन या नावाने वावरत आहेत. प्राननाथ सेगदार ज्या कारणास्तव ' स्वामीचे घर सोडून ' येतो, जवळ जवळ त्याच कारणास्तव ' परगणे मजकुरी सरकारकाम सुरु करावयास जिवाजी शेगदार येथे आला आहे. षड्रिपूंमुळे जिवाजी शेगदाराची जी अवस्था झाली तीच प्राननाथ सेगदाराचीही झाली आहे. जरासंध चोपदाराच्या आगमनानंतरही द्वैती ' प्राननाथ ' आणि अद्वैती ' जिवाजी ' यांना वृद्धापकाळी भोगाव्या लागणाऱ्या भोगातही एक प्रकारचे 'अद्वैत'च आहे ! नाथाच्या कित्येक भारुडात या अवस्थेची एकसारखीच वर्णने आढळतात.








नाथांच्या 'किल्ले कायापुरी'त आणि प्रस्तुत रचनेतील 'देह–नगरी'त किती तरी साम्य आढळते. 'साम्य आढळते' असे म्हणण्यापेक्षा 'फारसे वेगळेपण आढळतच नाही' असे म्हणणे अधिक सुसंगत होईल. नाही म्हणायला इहलोकी केलेल्या पापासाठी भोगाव्या लागणाऱ्या शिक्षांचे– नरकवासाचे जे वर्णन प्रस्तुत अर्जदास्तात केले आहे ते मात्र थोडेफार वेगळे वाटते. त्याचीही बीजे नाथांच्या 'किल्ला' किंवा 'अभयपत्र' यासारख्या भारुडात आढळतात. जिवाच्या उद्धारासाठी ज्ञान, भक्ति आणि वैराग्य या त्रिविध उपायांचा नाथ किंवा भागवतसाम्प्रदायिक जसा निर्देश करतात, त्याचप्रमाणे तो प्रस्तुत भारुडातही केला आहे. 'ज्ञाना'पसि प्रेम उत्तम' यासारख्या वचनावरील व 'असती परी' वरील महानुभावियांची श्रद्धा लक्षात घेता, या त्रिविध उपायांच्या पुरस्कारात कोणतेही अनौचित्य किंवा अप्रस्तुतता जाणवत नाही. तथापि प्रस्तुत भारुडात प्राननाथ सेगदारास उपाय–योजना सांगत असतानाच 'याचा उपाव प्रान्या आइकै चीत देऊन: तेथे आहेत आमचे भगवंतराव दीवान :

... ... ...

भगवंतरावें आमचें दीवान : गीताबाई खावंदीन :
दोघे सांगती ते प्रमान : तों मानावें :

–असेही म्हटले आहे. नाथांनी आपल्या 'जात्रचिठी' या भारुडात 'भागवतराव दिवाण' आणि 'गीताबाई' यांचा या संदर्भात निर्देश केला आहे, तो अधिक सयुक्तिक वाटतो कारण भगवंतराव दिवाण इहलोकी आहेत, त्यांची भेट घ्यावी व त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वागावे, असा उपदेश केला आहे. तेव्हा या स्थळी गीता– भागवत या ग्रंथांचाच निर्देश केला असण्याचीच शक्यता अधिक आहे. 'भगवंतराव' या शब्दाऐवजी 'भागवतराव' हा नाथांचा शब्दच या ठिकाणी अधिक समर्पक वाटतो.

प्रा. रा. श्री. जोग[1] यांनी म्हटल्याप्रमाणे वाङ्मय-दृष्ट्या हा सारा बुद्धीचा खेळ असून त्याचे स्वरूप चमत्कृतीचे आहे. यातील रूपकाचे आवाहन भावनेपेक्षा बुद्धीलाच अधिक होते. आणि नाथांच्या बहुविध रचनेत अशा प्रकारच्या रूपकात्म, अथचमत्कृतिपूर्ण रचनेसही एक महत्त्वाचे स्थान आहे, हेही नाकारता येणार नाही. कदाचित् यासारखी रचनाही अध्यात्म – विचार – प्रसारास विशेष उपकारक ठरली असावी आणि त्यासाठीच 'भावार्थ रामायण' किंवा 'भागवता' सारख्या ग्रंथांची रचना करणाऱ्या नाथांना या भारुडांसारखी चमत्कृतिपूर्ण रूपकात्म रचना करण्याचा मोह पडला असावा. ही रचना लोकभाषेत असल्याने जनसामान्यावरही तिची मोहिनी पडणे स्वाभाविकच होते– व तशी ती पडलीही. नाथांच्या भारुडांच्या लोकप्रियतेची अशी किती तरी कारणे असण्याची शक्यता आहे. त्या लोकप्रियतेमुळे महानुभाव सांप्रदायिकांनाही तत्सम रचना करावी व तिच्या साहाय्याने आपल्याने सांप्रदायिक विचाराचा, मताचा पुरस्कार करावा असे वाटणे मुळीच अस्वाभाविक नाही. प्रस्तुत महानुभाव अर्जदास्ताच्या निर्मितीमागे अशा प्रकारचीच विचारसरणी असण्याची दाट शक्यता आहे.

प्रस्तुत रूपक नाथांच्या एतद्विषयक रूपकाशी जुळते. एवढेच नव्हे तर नाथांच्या विविध रूपकातील अनेकविध कल्पनांचा समुच्चय या भारुडात केल्याचे आढळते. नाथांच्या मूळ 'अर्जदास्तांत नसलेल्या पण त्यांच्या 'अभयपत्र', 'ताकीदपत्र' आणि 'जात्रचिठी' या भारुडातील कल्पनांचा संकर प्रस्तुत महानुभाव अर्जदास्तात झाला आहे. आणि असे असूनही नाथांच्या एतद्विषयक भारुडांच्या शेवटी असलेले 'एका जनार्दनी शरण' यासारखे उल्लेख यात आढळत नाहीत. तसेच नाथांच्या 'कौलपत्रां'तील

... 'जनार्दन सद्गुरुकृपेचा सागर. तेणे एका-जनार्दनीं आनंदमय समाधान झाले. द्वैताचा लेश उरला नाही.' यासारखे किंवा 'कौल' या भारुडातील 'चारी वर्ण चारी आश्रम । याच देही उत्तम मध्यम । हृदयी धरुनिया प्रेम । नामस्मरण करा रे ॥'

– यासारखे उल्लेख प्रस्तुत रूपकात आढळत नाहीत उलट,

'नको हीडु तु नवे पेठा : तेथील उदीम माहाखोटा :
तवं तु वाउग्या देसी झरा : '

–यासारखे किंवा 'सर्वे धर्म तेजुनी : परधर्मी चीत लावी' यासारखे उल्लेख आवर्जून येतात. 'परधर्म' या संज्ञेने महानुभाव संप्रदायाचा निर्देश येथे स्पष्टपणे

१. मराठी वाङ्मयाभिरुचीचे विहंगमावलोकन पृ. ८९.

केला गेला आहे. त्याचप्रमाणे कृष्णनामाचेच स्मरण करावे असे भारुडाच्या उत्तरार्धात पुनःपुन्हा म्हटले आहे. श्रीकृष्णास महानुभाव सांप्रदायिक पूर्णावतार मानीत असल्याने अन्य देवतांचा वा अवतारांचा निर्देश या भारुडात होत नाही, ही गोष्ट लक्षात घेणे आवश्यक आहे. त्यात गीता आणि श्रीकृष्ण यांचाच मुख्यत्वेकरुन निर्देश केला आहे व हा निर्देश पंथीय विचारसरणीस अनुसरूनच आहे. या सर्व गोष्टी जमेस धरता प्रस्तुत भारूड महानुभावियांचेच असले पाहिजे, याबद्दल शंका बाळगण्याचे कारण नाही.

'पहिले शब्द होते मोकळे :
**गोविंद** सांकळा लावीली जाना : '

— या चरणात कविनिर्देश केला आहे, असे वाटते तथापि या गोविंद कवीचा निर्देश किंवा त्याच्या काळासंबंधीची वा रचनेसंबंधीची माहिती वाङ्मयेतिहासात उपलब्ध होत नाही. ज्या पोथीत हे भारूड लिहिले आहे, ती प्राचीन आहे. तिचा कागद, लेखनपद्धती इ. वरुन ती सोळाव्या किंवा सतराव्या शतकातील असावी, असे वाटते.

अशा प्रकारची अन्य रचना उपलब्ध झाल्यास महानुभावियांच्या स्फुट रचनेवर अधिक प्रकाश पडेल, असे वाटते.

## अर्जदास्त

|| श्री ||

सकळ गुणसंपन्ना : सौजन्यसीधु कृपाघणा :
परोपकारी जीवोधरना : उदारा :
आलंकृत लक्षमी श्रीचरनी
धर्ममुर्ती जीवोद्धरनी : माहामेरू कै(व)ल्यदानी:
तु दातारा : जीवगौ-प्रतीपाळका : तुंचि स्रुष्टीमुळकारका:
दुखना (शक) सुखदायेका : करुणाकरा :
विनती लीहावयाचे कारन : स्वामी ऐका चीत देऊन
सेवक तुझा रंक मी दीन : दीन-उधारा || १ ||
आर्जदास दरबंदगी लीहुन : बंदा कमीन-कमतरीन :
खानाजाद बंदेगान : स्वामीची आज्ञा ते प्रमानः
मज सेवकासी || ० ||
बंदा प्राननाथ सेगदार : मी तर अनंदीचा चाकर :
स्वामीचे अज्ञेने सोडीले घरः छतीस घेउनी बराबरः
सीरपाव पावलो अपार : मग वसविले ग पुर :
तेथे कोट्यान कोटी लसकर : पुर्न जाले देह नग्र || ० ||
स्वामीचा हुकुम मजला : परवाना दीवानी :
छतीस कमाईसदार मजसंवे देउनी : सत्त वरसाचा कौल
दिल्हा मजलागुनी :
करी कमाईस मुदलास नये हानी ||०||
द्वादस वरूसं हो परियेसी : वाकब न हो तो कामकाजासी:
गावीचा वृत्तांत अपनासी काही कळेना :
अपन प्रवीन जालयांवरी : कमाईस मांडली बहुं बरी :
अहो तंवं उदैली अवधारी :
बंडे नाना || ० ||
दसाबाईनं केली चाल : जुमीनदार फीतावले :
अज्ञान-पाटील येक सरले : तमाम प्रगना :
मनाजी देसमुख महाखोटा : हा फीरवीतो चुहुंवाटा :
काजी देसपाड्या अमल मोठा : अवेरेना :
मानाजीने माडली धुमाळी : उगला न राहे येके स्थळी :
कामाजी लंपट मांहांचळी : स्वहीत-दप्तर वीसवेजळी
ते बुडवीले :
डंभाजी पाटील पन मोटा : अहंकार-चौधऱ्या आंगी
ताठा :
क्रोध-सोठ्या कळीचा कांटा : मछर-नाईक दुघट मोटा :
हा बहुतांसी घेतो झटा :
दसा-धांगडीचा संग खोटा : ईनं केल्या बारा वाटा ||
दसा-धांगडीसंगे मातनि गेले भारी :
सा जन पुरुस नवजनी नारी :
आपुला ले रं ग वा वं र ती न ग वी :
मनजी देसाईयां चाकरी तो भर उभरी :
मग या समस्तांचे बोलीं : देहे-नगरी कमाईस केली :
स्वहीताची सुद सांडीली : गेलो भुलोंनी :
ममताई देसमुकीनीनं ऐसें केलें :
जागा जागा पडीत पाडिले :
अधर्म-तनक वाढवीले : जाले राने :
ऐसी ममताई माहाखोटीः ठाई ठाई चढवीली काटी
दसा-घरनिधी सेवटी : गेली नीघोनं :
ममताईचा उपकार जाला : कामाजी पांड्या मस्त केला।
स्वहीत-मसुल बुडवीलाः केली नागवन :
होता दसेचा मज भवसा : ईनं मोठा केला तमासा :
सेवटी घालुनी गेली फांसा :
जरासंद चोपदार कैसा : सेवटी धाडुनीया दील्हा :
जरासंद चोपदार अला : कर्नखेडां येउनी डेरा दील्हा :
दहसत पडली समस्ताला : तमाम पळ तेहीं काढीला :







## एक महानुभाव अर्जदास्त

कर्नखेडांचा पळोंनी गेला : चीत न दे कोन्हाच्या बोला :
तमाम गावंगनं : मुखखेड प्रगाना खराब जाला :
डोसगांवींची दिवे-लावनी बुडाली :
दंतापुरी तमाम वोस जाली :
नासीकी पानी मात्र : जीव्हापुरीने चव सांडीली :
मखखेड प्रगान्याची आवधी दसा गेली ॥ ० ॥

केसापुरीची पांढरी राहीली आवधारा :
सीरपुर कांपतें थरथरा :
हातगावीचें दातारा : चळन- वळन राहीले :
उरखेडाची उरली हाडे : मनपुर ते जाले वेडें :
उदरखेड मागं-पुढे : हाडसीं बैसले ॥ ० ॥
स्थानभ्रष्ट जालें लींगापुर : गाडापुरासी नाही धीर :
ऐसा जालासे वीचार : पाजे कळले :
पायांळकरांची मेटें वळली :

तमांम अवधीं साडुनि गेली :
देहे- नगरी खरात्र जाली : ह्मनोनी लीहीले :
येथे वीचार ऐसा जाला : तवं मृचंद आहेदी आला :
तेनं वृत्तांत सांगीतला : येमाजीपंत मुस्तपीयांसी तुला :
पडेल काम :
येमाजीपंत आइकीला कानी :
मा झा त ह गेला उडोनी :
मजवर क्रोध त्याचे मनी : मजला नेईल तो बाधोनी :
चौदा जन गेले खाउनी : येकला पडलो नीर्वानी :
जैसी घडीयेचीये पानी : धाये जेगटालागुनी :
तैसी होईल परी : मजला हा कळला वीचार :
ह्मनुन अर्जदास म्या लीहीली हाजुर :
येमाजीपंत मुस्तपीयांचा बहु वोखटा मार :
होईल कोन गती मी तर गुन्हेंगार ॥ ० ॥
सालगुदस्ताची हा र फ़ू सा रे वली :
हाली साल अगा आली :
मृतचंदाची तलब आली : मसाला आंत प्रेताचा :
मृतचंद वृतांत सागीतला : येमाजी बाधुन नेईल तुला :
मार देईल वहीला : चौन्हासीचा ॥ ० ॥
ताम्र भुमीकेवरी नीजवीती :
खैरा- ईंगळावरी चालवीती :
आसीपत्रावर टाकीती : चुर देहाचा :
उसळते तेलाची कढई : त्यात टाकुनी देती पांहीं :
सुळ वोवीती डोळा दोहीं : भोग दुखाचा ॥ ० ॥

कुंभीकामाजी घालीती : घोडा-तातलीया बसवीती :
लोहाची पुतळीयेसीं भेटवीती :
मस्तक घनं ते पीटीती : आर्नीवरी :
काउळे डोळे ते काढीती : कुतरे लोळे ते तोडीती :
काळकुटाचे नाकवनी देती : सीसें तोडी तें वोतीती :
सांडस जीव्हाते उपडीती : कोळें सर्वांगी बांधीती :
आलंगाचीया आनीयांवरी बसवीती : सरपंजरी घालीती :
ऐसे चौन्हासी नर्क देसचळ यासी ह्मनती :
आनीक तीन रासी त्या मोट्या आसती :
दोघांचे आयुस्ये तें लक्ष-कोटी गनीती :
येकाच्या आयुस्याची नाही परमीती :
ऐसा मार कै चुकेल : यांचा उपाव सांगावा :
ह्मनोन आर्जदास लीहीली : महांराजो देवा :
बंदगीस रोख न होअवे : सेवकासि अपुले ह्मनावें :
बहुत काये लीहावे : जीवतारक तुं कृपाळुवा :
सकळ युक्तिप्रवीणें : वदा प्राननाथ सेकदार :
तुम्ही आर्जदास पाठवीली : तेथींचा कळला वीचार :
प्रगाने देहेगावीचा तुम्ही लीहीला समाचार :
धाडीले नफयासाटीं तवं मुदला आनीली हार :
साल गुदस्ताची ते हारपसानी :
नीघाली होती तुजलागुनी :
ते फारकत करावी जन्मरोजगार करोनी :
म्हनोनी ताजी सनद देवोनी धाडीले तुज :
नीस्वतमंडळा धाडीलें : देहेगाव तुज लावील्हें :
ते तवं स्थळ बहु चागले : जोडती दोन्ही भांडवलें :
सकृत भांडवल जोड वहीले : ऐसे तुजला सांगीतलें :
वीसवसेट लोभनायेकें चाळवीले :
जोडीले सकृते हीरोनी नेलें :
आवीद्या-कळवांतीन तीच्या नाचात गुंतलासी :
स्वहिताची सुद साडुनी दील्ही कैसी :
मनाजी दहामुख कामाजी पांड्या सेर केले यासी :
डभ प्रपच आहाकारं : लुटले स्वहीतासी :
गैरमोकदम सुपदस्त जाले : तमाम आवघे येक सरले :
तुझे स्वहीत लुटोनीयां नेलें : केली नागवन :
तोंडापुर कर्नखेडें : दोही गावी बहु सुरवाड :
लवन खरीप कीर्तन रब्बीआती पाडे : पीक दारुन :
ते पीक ज्याचे हाती लागलें : त्याचे सर्व दळीदा गेले :
पर तें पीक तों गमावीले : बोलीला गुणें :







लागलासी ममताईचा बोलीं : दोहीं पीकाची धुळ केली :
तुझी बुध का हारपली : मुळीचा अज्ञान :
नरदेहे-नगरास तु जाऊनी :
सातांमधीं तुं गेलासी भुलोनी :
नानां अकर्मीचे अचरनी : पाप-भये कांही मनी :
धरीले नाही ॥ ० ॥
अनंता जन्मी बाकी रें बली ह्मनुन :
नाना यौनी लागसी फीरून :
येमाजीपंत मुस्तपी नेइल धरून :
पर्सीस करील माहांदारून :
आतां कळले तुजलागुन : ह्मनौनि गेलासी बीहुन :
याचा उपाये काये करनं :
ह्मनोनी अर्जदास्त धाडीली लीहुन ॥ ० ॥
याचा उपाव प्रान्या आइकें चीत देऊनें :
तेथे आहेत आमचे भगवंतराये दीवान :
मुळा धि ळी र राये वकील करून :
भाव प्रधान करूनी : त्याची भेट घेनं :
भगवंतराये आमचे दीवानं : गीताबाई खावंदीन :
दोघे सांगती तें प्रमान : तों मानावं :
तीची बाळकें तीघे नाना : दोघे पुत्र तीसरी कन्या :
ज्ञान भक्त वैराग्य तिघां जाना : सरन जावं :
भक्तबाई घराची बळकट : ते चुकवील आवघे कष्ट :
येमाजीसी न पडे गांठ : सुखे आसावें ॥ ० ॥
वैराग्य-घोड्यावर होये स्वार : ज्ञान भाला भक्तसमसेर :
सारी रिपु करूनीयां जेर : त्यासी मारावं :
कामक्रोधाची खाल काढी : मद-मछर बांधुनीयां पाडी :
रागद्वेश करावे सा घडी : मनाजीचे पाईं बेडी :
घालुनीया टाकी :
आसेची ता(तों)डी आसा : बांधोनीयां पाडी मनसा :
कल्पनेचा तोडी खां(फा ?)सा :
पापीन तृष्णा घाली फांसा :
वासना फीरवी दाही दीसां : संगती नको होउ पीसा :
पापीन हे आवीद्या : जीवासि लागली अवदसी ॥०॥
ज्ञान आग्नि करूनी जाळुन टाकी या ( ? )ला :
पश्चाततापं ख(?) जाती :
आजीज होये त्याला :
तुझीये हरफसानीचा तो घेईल हावाला :
मग तु सुखे राहे : धोका नाही तुला ॥ ० ॥

रीपुसैनें करूनीयां जेर : मोहीम-साजीस करावी :
**सर्व धर्म तेजुनी परधर्मी चीत लावी :**
ज्ञान भक्त वैराग : बरवे धरूनीयां जीवी :
नामाचे स्मरन : आष्टो प्रहर आठवी :
नको हीडु तु नवे पेठा : तेथील उदीम माहांखोटा :
तवं तु वाउग्या देसी झटा : तेथे यमाचा चपेटा :
चुकत नाही ॥०॥
**वचन सांगे गीताबाई : पाहे तु आठरावे आध्याई :**
**कृष्णनामाची फीरे द्वाही :**
**तेथ येमाचे णं चाले काही :**
प्रान्या नामी तु तत्पर राही : मग तुजला धोका नाही:
नामाचे स्मरन : बुडो नेंदी भवडोही :
नामाचे बळे बहुत जन तरले :
**कृष्णनाम सांडुनी आव्हाटा पडले :**
येमाजीपंत मुस्तपीयानं बांधुनीया नेले ॥ ० ॥
मृतचंदा तलब येईल ह्मनउनी : लीहीले पाही :
हे तब सांधतों तजला : त्याची तलब टळत नाही :
अंतकाळे च मा में व : ऐसा स्मरनी तत्परहीं :
चुकतील माहादुखे : मग स्वरूपी तु सुखे राही:
बतीसांचे ते साधन नको : सोळामधी तु रीगु नको :
चौघामधी तु जाउ नको : ठकसी वायां :
चौघेजनें तें भुलली : अनीक चौघे वेडावली :
साही जनाची गती कुंटली : आठरा जने भाबाली :
नाना साधनी रीगाली : देखत देखता नागवली :
आकरावा आध्याई सांगीतली :
ऐसे गीताबाई बोलीली ॥ ० ॥
गीताबाईचा तु मानुन घेई सब्द :
तेने तुटतील तुझे भवबंध :
फीटल आज्ञान : मग तु होसील सुध :
हाजर पर्वाना : पाहे मोर्तब सुध :
जीवाजीची आर्जदास : आनीक हाजुर्चा पर्वाना :
पहीले शब्द होते मोकळे :
गोवींद सांकळा लावीली जाना :
बरवी घालुनीयां दुष्ट : सीधांत मनासी अना :
पदप्रमानं चाला : तुम्हासी भेटेल कृष्णराणा:

**अर्जदास संपुर्न :**

---












प्रा. उषा वि. करंवेळकर

# अगस्त्य आणि लोपामुद्रा [ऋग्वेद – १·१७९]

[ ऋग्वेद मण्डल १ सूक्त १७९ हे 'अगस्त्य–लोपामुद्रा संवादाचे सूक्त आहे. त्याचाच विचार प्रस्तुत लेखात केला आहे. हा संवाद 'अश्लील' ह्या सदरात बसविला जातो. पण तो संवाद खरे म्हणजे निसर्ग–संबद्ध घटनेचाच एक सुंदर नमुना आहे.

'अगस्त्य' हे दावाग्नी वा वणवा ह्याला दिलेले गुप्त नाव असून 'लोपामुद्रा' म्हणजे जिच्यावरील माजलेले रान जाळून टाकले आहे अशी भूमि होय. ही विधाने मत्स्य पुराणाच्या आधारे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

संपूर्ण लेखाचा हा सारभूत भाग वर दिला आहे. ]

## १ प्रास्ताविक

पुराणातील कथांचे वाचक 'अगस्त्य' आणि 'लोपामुद्रा' ह्या दोन नावांशी परिचित असतात. 'अगस्त्य' हे ऋषीचे नाव असून 'लोपामुद्रा' ही त्याची पत्नी होय. अर्थात हे मी नव्याने सांगावयास हवे असे नाही. पण यापुढे येणारा बराचसा भाग मात्र बहुतेकांना अपरिचित व नवीन असाच आहे.

भारतीय साहित्याला ललामभूत असलेल्या वेदचतुष्टयीमध्ये अगदी मुकुटमण्याचे स्थानी विराजमान असलेल्या ऋग्वेदात देवतांच्या स्तुतीने परिपूर्ण आणि भक्तीने ओथंबलेली अनेक सूक्ते येतात. त्यावरोबरच त्यात मधून मधून अर्थदृष्टया संदिग्ध मानल्या जाणाऱ्या सूक्तांचा देखील समावेश आहे. या सूक्तमालिकेतच 'अगस्त्य–लोपामुद्रा–संवाद' या स्वरूपाचे एक सूक्त– पुष्प ऋग्वेदात आलेले आहे. ऋग्वेदात असलेल्या दहा मण्डलापैकी शेवटचे मण्डल जे दहा, ते व पहिले मण्डल ही बरीच अर्वाचीन मानली जातात. यापैकी पहिल्या मण्डलात आलेले १७९ क्रमांकाचे सूक्त म्हणून वरील संवादाचा निर्देश करता येईल. एकूण सहा मंत्र असलेल्या ह्या सूक्तात अनेक गोष्टी अगदी दाटीवाटीने बसलेल्या दिसतात.

वृद्ध पति अगस्त्य आणि त्याची यौवनाने रसरसलेली, कामार्त पत्नी लोपामुद्रा या दोघांच्यामधील हा संवाद आहे. पत्नीच्या बिनतोड विचारसरणीपुढे धीरे धीरे माघार घेत शेवटी कामवासनेच्या आहारी गेलेल्या व्रतस्थ पतीचे दृश्य मोठे मनोवेधक आहे. संवादावर 'अश्लील' असे शिक्कामोर्तब करून अनेक अनुवादकर्ते त्याचा संपूर्ण अनुवाद देण्याच्या भानगडीतच पडलेले नाहीत. संशोधन–क्षेत्रात लोपामुद्रेचे स्वरूप जाणून घेण्याचा प्रयत्न अनेकानी केला. कार्य अजून पूर्णत्वाला गेलेले नाही. म्हणूनच ह्या संवादाबद्दल बरेच लिहिण्यासारखे आहे.

## २ विविध मते

श्रोडर, ओल्डेनबर्ग, बर्गेन, गेल्डनर, लुड्विग् आदि अनेक परकीय पण्डितांनी ह्या संवादाचे विवरण केलेले आहे. वैदिक कालापासून आजतागायत भारत हा शेतकीप्रधान देशात अग्रगण्य ठरला आहे. अशा ह्या देशात "शेतातील धान्य काढल्यानंतर त्याची (शेताची) फलोत्पादकता पुन्हां वाढावी यासाठी करण्यात येणारा एक पुरातन संस्कार" या दृष्टीचा अवलंब करून ह्या संवादाकडे त्या परकीय पण्डितांनी पाहिले आहे. म्हणूनच श्रोडरने पुढील उद्गार काढले आहेत. – "That which has the seal of disappearance on it, is a suitable name for the worn out corn–spirit." श्रोडरने व्यक्त केलेली ही कल्पना वैदिक आर्यकवींच्या कल्पनाशक्तीच्या आवाक्यात येणार नाही असे ओल्डेनबर्गला वाटते. बर्गेन तर "हे सूक्त गूढार्थाने परिपूर्ण आहे." असे म्हणून हात झटकून मोकळा होतो. "अतिशय कष्टप्राप्य असलेल्या व त्याच्या निवासस्थानाहून आणलेल्या स्वर्गीय सोमाची (अगस्त्य) अतिशय



अनुक्रमणिका






कळकळीने केलेली प्रार्थना "लोपामुद्रा" असे देखील मत काहींनी मांडले आहे.

वैदिक संस्कृती ही यज्ञविधिप्रधान होती त्यामुळे ऋग्वेदात आलेल्या १०२८ सूक्तांना यज्ञाच्या कुठल्या न कुठल्या विधीत देवतेला उद्देशून अग्नीत आहुती (त्या देवतेचा भाग) देत असताना म्हणजे असा 'विनियोग' असणे. काही सूक्तांच्याबाबतीत अशा प्रकारचा विनियोग सापडत नाही. त्यामुळेच ऋग्वेदासारख्या धार्मिक ग्रंथात देखील "काही भाग धर्माशी निगडित नसलेला आहे." असे प्रतिपादन करून परकीय पण्डितांनी त्या सूक्तांचा 'Secular Hymns' असा वेगळा वर्गच दाखविला आहे. ह्याच वर्गात येणाऱ्या सूक्तापैकी 'अगस्त्य-लोपामुद्रा संवाद' सूक्त हे एक आहे.

आपल्याकडील टीकाकारांची ह्या सूक्ताबाबतची मते देखील पहाण्यासारखी आहेत. यास्काचार्य आपल्या निरुक्त ग्रंथात ह्या सूक्तातील ४ थ्या ऋचेसंबंधाने विवरण करीत असतांना म्हणतात– "या संवादात लोपामुद्रेने कामवासनेच्या तृप्ती-साठी केलेला शोक आहे, विलाप आहे." यास्का-चार्यांचे शब्द असे–

"संरुद्धप्रजननस्य ब्रह्मचारिणः इत्यृषिपुत्र्या विलपनं वेदयन्ते"

( २·६ )

"कामवासनेमुळे प्रवृत्त झालेला ऋषीच अशा प्रकारे या संवादात आपल्या पत्नीशी बोलण्यास सुरुवात करीत आहे." शौनकांनी पुढील शब्दात त्यांचे मत मांडले आहे––

"ऋतौ स्नातां ऋषिर्भार्यां
लोपामुद्रां यशस्विनीम् ।
उपजल्पितुमारेभे रहः संयोगकाम्यया ॥

( ४·५७–६० )

–एकूण काय तर ह्या संवादामागील हेतुबाबत यास्काचार्य आणि शौनक ह्यांचे ऐकमत्य नाही. "कामवासनेच्या पूर्णपणे ताब्यात गेलेला ऋषीच बोलत आहे असे शौनक अगदी ठामपणे सांगतात." ( रिरंसुस्तामथागस्त्य उत्तराभ्यामतोषयत् । ) नीतिमञ्जरीने यास्कांचे मत उचलून धरले आहे :

"कुलजापि सती हीना निर्लज्जा भोगतो भवेत् ।
लोपामुद्राऽलपत्कान्तं भोगाय ब्रह्मचारिणम् ॥

(५९)

–या सगळ्या चर्चेतून कामवासनेच्या आहारी गेल्यामुळे दोषास पात्र असलेले कोण ? अगस्त्य ? की लोपामुद्रा ? हा प्रश्न सुटलेला नाही. अगस्त्याने आपल्या व्रताचा भङ्ग केला आहे की लोपामुद्रेने स्त्रीसुलभलज्जेला साजेशी नसलेली मागणी करून स्वतःवर दोष ओढवून घेतला आहे ?

बृहद्देवता पुढे म्हणते की या सूक्तांतील शेवटच्या दोन ऋचा "घडलेल्या पापाचे क्षालन म्हणून प्रायश्चित्त दर्शक आहेत." यासंबंधाने लिहिताना युरोपीय पण्डितांनी असे म्हटले आहे की आपला गुरू व त्याची पत्नी यांचा हा एकान्तातील संवाद ऐकून पश्चात्ताप पावलेल्या शिष्याला – पतिपत्नीच्या एकान्तांतील संभाषण–श्रवणाबद्दल प्राप्त झालेल्या पापाचे परिमार्जन करण्यासाठी या संवादातील शेवटच्या दोन ऋचा 'ऋग्विधाना'ने सांगितल्या आहेत." (१.१४७)

सूक्तातील पहिले दोन मंत्र लोपामुद्रेचे आहेत ह्याबद्दल दुमत नाही. "रात्रंदिवस पतिगृही कष्ट उपसल्यामुळे स्वतःच्या सौंदर्याची हानी होत आहे" हे उघड्या डोळ्याने जिला बघवत नाही अशी लोपामुद्रा त्या मंत्रातून कुरकुरत आहे. स्त्रीस्वभावच तो ! पण पति-पत्नी समागम असेल तर पत्नी ते देखील कष्ट विसरते म्हणून "पतीने पत्नीशी संगम करावा" असे आपले मत बोलून दाखविताना लोपामुद्रा मागेपुढे पहात नाही. सूक्तातील पुढील शब्दातून हा आशय व्यक्त झालेला आहे.–

"पूर्वीरहं शरदः शश्रमाणा दोषा वस्तोरुषसो जरयन्तीः ।
मिनाति श्रियं जरिमा तनूनामप्यू नु पत्नीर्वृषणो जगम्युः ॥ (ऋ १.१७९.१)

–मनावर ताबा मिळविलेल्या म्हणजेच ज्यांना निग्रही म्हणतात अशा ऋतानुसारी पूर्वजांची अवस्था देखील अशीच होती. 'आपापल्या स्त्रीच्या इच्छेविरुद्ध ते फार काळ टिकाव धरू शकले नाहीत.' असे निग्रही पूर्वजांचे उदाहरण देऊन तिने आपल्या

व्रतस्थ पतीला बोलण्यास जागाच ठेवली नाही. तिचे वरील विचार पुढील शब्दातून व्यक्त झालेले आहेत--

ये चिद्धि पूर्व ऋतसाप आसन्
त्साकं देवेभिरवदन्नृतानि ।
ते चिदवासुर्नह्यन्तमापुः समू नु पत्नीर्वृषभि-
र्जगम्युः ॥
(ऋ. १·१७९·२)

ह्यानंतरचे दोन मंत्र अगस्त्यांचे आहेत. त्यात त्याचा निराशेचा सूर दिसतो. कामवासनेच्या तावडीत जाऊ लागलेल्या मनाला आवर घालणे त्याला क्षणाक्षणाला अधिकाधिकच जड जात आहे. कारण आकर्षण सारखे वाढतेच आहे. हे कामाचे आक्रमण कुठून आणि कसे झाले हे देखील त्याच्या ध्यानात आले नाही "लोपामुद्रा वृषणं नी रिणाति" असे म्हणत स्वाधीन झालेल्या पत्नीला शेवटी त्याने जवळ घेतले आहे.

कुरकुरणारी आणि विनवणी करणारी लोपामुद्रा, व्रतस्थ असल्यामुळे प्रथम नकार देणारा, ( मनातून हळूहळू राजी होत असलेला ) आणि पुढे तिची इच्छा पूर्ण करण्यास सरसावलेला अगस्त्य यांच्या संवादाचा हा प्रसंगच नाटचपूर्ण आहे. अगस्त्याच्या स्वगताने ( १.१७९-४ थ्या ऋचेचा शेवटचा भाग ) ह्या नाटचपूर्ण प्रसंगाच्या कळसाची जागा सुशोभित करून त्याची शोभा अधिकच वाढविली आहे.

पौरस्त्य आणि पाश्चात्य पंडितांच्या जुन्या नव्या विचारसरणीच्या अनुसंधानाने ह्या संवादाबाबत वरील गोष्टी आपण जाणू शकलो आहोत.

### ३ अगस्त्य

संवादातील अगस्त्यांचे स्वरूप जाणण्याचा अधिक प्रयत्न आता आपण करणार आहोत.–
'अगस्त्य' हा मित्रावरुणांचा पुत्र व वसिष्ठांचा भ्राता असल्याचे ऋ. मण्डल ८, सूक्त ३३ यांत म्हटलेले आहे. अगस्त्य आणि 'वशिष्ठ' दोघांचा जन्म अलौकिक रीत्याच झालेला आहे. त्यांची माता उर्वशी होय असे बृहद्देवता सांगते. अगस्त्याबद्दल तो 'मान' 'मान्य' 'मान्दार्य' आहे असे निर्देश ऋचातून आलेले आहेत. त्याला 'मानस्य सुनुः' असेदेखील एके ठिकाणी म्हटले आहे. अगस्त्य=मान हे समीकरण सिज् ( Sieg ) या पाश्चात्य पण्डिताला मान्य आहे. बर्गेन हा पाश्चात्य पण्डित ते समीकरण मानत नाही. ओल्डेनबर्ग 'मान' हे अगस्त्याचे पूर्ण नाव असावे असे सुचवितो. ह्या पुराणप्रसिद्ध ऋषीला देवांच्यात देखील सन्मानाचे स्थान होते "इन्द्राबरोबर मरुतांनासुद्धा यज्ञात हविर्भाग मिळावा.." अशा ह्याच ऋषीच्या सूचनेमुळे रुष्ट झालेल्या इन्द्राचे मरुतशी पटेना. त्यांच्यात पुन्हा ह्या अगस्त्यानेच सख्य प्रस्थापित केले. हा विषय ऋ. च्या १ ल्या मण्डलातील १६५, १७० व १७१ ह्या क्रमांकाच्या सूक्तातून आला आहे. ही तिन्ही सूक्ते ह्या ऋषीची मानली जातात. इन्द्र अगस्त्य ऋषींच्या शब्दाला मान देत असे. ( ऋ. १.१७० वरून ) हे स्पष्ट आहे. विश्पलेला नवीन पाय बसविण्याच्या कामात अश्विनांना ह्या ऋषीचे बरेच साहाय्य झाले. इन्द्राकडून ह्या ऋषीला गायत्री उपनिषद् प्राप्त झाल्याचा निर्देश जैमिनीय ब्राह्मणात आला आहे ( ४.१५. १ ).

हा ऋषि खेल राजाचा पुरोहित होता असे ऋ. वरील प्रसिद्ध टीकाकार सायण सांगतात. सिज् ( sieg ) ने सायणांना दुजोरा दिला आहे. खेल = विवस्वत् असे समीकरण मांडून पिशेलने खेल देवता आहे असे म्हटले आहे. "इतरांच्यामध्ये अगस्त्यच आकाशापर्यन्त नक्षत्ररूपाने चढला." असा निर्देश तैत्तिरीय आरण्यक ( १·११·१ ) यात मिळतो. वसिष्ठ आणि तृत्सु ह्यांचा परिचय अगस्त्यान घडवून आणल्याचे ऋ. ८·३३·१० त आले आहे.

अथर्ववेदात अभिचाराच्या ( जादुटोणा ) संदर्भात ह्या ऋषीचा उल्लेख येतो. ( अथर्ववेद २·३२-३; ४·३७·१ ) ऋग्वेदानुक्रमणीत एक अभिचारसूक्तच ह्या ऋषीच्या नावावर दिलेले आहे ( ऋ. १·१९१ ) मैत्रायणी संहितेने कानावर चिह्न असलेल्या गाईशी त्याचा संबंध जोडला आहे. लोपामुद्रा ही त्याची पत्नी होय. ( ऋ. १·१७९ ). पुराणांच्यावरून ती विदर्भराजाची कन्या होती.

पुराणातून– तरुण आणि सुंदर लोपामुद्रेला वृद्धपति मिळाल्याचे वर्णन आहे.

## ४ संस्कृत साहित्यात

महाभारत ( ३.९४-९९ ) अनुसार लोपामुद्रा ही विदर्भराजकन्या होती. अगस्त्याने तिच्याशी विवाह करण्याची इच्छा दर्शविली. ऋषीच्या भयाने राजाने आपली कन्या त्याला दिली. तिने पतीची बराच कालपर्यन्त सेवा केली. एकदा, तिच्या पावित्र्यामुळे व सौंदर्यामुळे मोहित होऊन आकृष्ट झालेल्या तिच्या पतीने तिला मैथुनासाठी बोलाविले. "पित्याच्या घरी ज्या प्रकारच्या ऐश्वर्यात मी वावरले तसे ऐश्वर्य माझ्या पतीला प्राप्त झाले तरच मी त्याची इच्छा पूर्ण करीन." अशी अट लोपामुद्रेने घातली. तिची ती आह्वान स्वरूपाचीच जणु अट पतीने स्वीकारली. ऐश्वर्यप्राप्तीसाठी तो घरावाहेर पडला. श्रुतश्रवा, व्रध्नाश्व, त्रसदस्यु आणि इल्वल या राजांच्याकडे संपत्तीच्या इच्छेने तो ऋषी गेला. इल्वलाकडून त्याला धनप्राप्ती झाली. पत्नीची अट पूर्ण झाली. पुढे तिला पुत्रप्राप्ती देखील झाली.

महाभारतातून मिळालेला वरील वृत्तान्त हा ऋग्वेदातील संवादाची पार्श्वभूमी तयार करणारा आहे. म्हणून बृहद्देवतेने दिलेले कथेचे स्वरूप बरोबर वाटते. ज्यात ऋषीनेच कामवासनेच्या आहारी जाऊन पत्नीला बोलाविले. त्यामुळेच यास्कांचे म्हणणे तितकेसे बरोबर नसावे. अनेक पुराणांच्या मधून अगस्त्याची कथा आलेली आहे; व त्यावरूनच अगस्त्याचे विन्ध्याला उल्लंघून जाणे; समुद्रजलाचे पान करणे; वातापि राक्षसाला पचविणे इ. कथांचे ज्ञान होते.

## ५ अगस्त्य = अग्नि

पुराणांनी अगस्त्य मुनीच्या संबंधात अनेक कथा दिलेल्या आहेत. त्यापैकी दोनच प्रसिद्ध आहेत. १)– विन्ध पर्वताला नमविणे व २) समुद्रजलाचे पान करणे. ह्यांच्याबरोबर ३) वातापि राक्षसाला ऋषीने पचविले ह्या कथेचा उल्लेख आपण करू शकतो. मत्स्य पुराणाने ही कथा पुढीलप्रमाणे दिली आहे. —

"त्रासदायक अशा राक्षसांना व दानवांना आश्रय देणाऱ्या समुद्रालाच नाहिसे करून टाकण्याची आज्ञा इन्द्राने एकदा अग्नि आणि वायु यांना दिली. समुद्राला संपवून टाकीत असता त्यातील निरुपद्रवी प्राणी विनाकारणच प्राणाला मुकतील– अशा सबबीवर अग्नीने इन्द्राज्ञेचे पालनास नकार दिला. आज्ञाभंगामुळे राग अनावर झालेल्या इन्द्राने अग्नीला पुढीलप्रकारे शाप दिला. —

मदाज्ञालङ्घनं यस्मान्मारुतेन समं त्वया ।<br>
मुनिव्रतमहिंसादि परिगृह्य त्वया कृतम् ॥ १५<br>
धर्मार्थशास्त्ररहितं शत्रुं प्रति विभावसो ।<br>
तस्मादेकेन वपुषा मुनिरूपेण मानुषे ॥ १६<br>
मारुतेन समं लोके तव जन्म भविष्यति ।<br>
यदा च मानुषत्वेऽपि त्वयागस्त्येन शोषितः ॥ १७<br>
भविष्यत्युदधिर्वह्ने तदा देवत्वमाप्स्यसि ।<br>
इतीन्द्रशापात्पतितौ तत्क्षणात्तौ महीतले ॥ १८<br>
अवाप्तावेकदेहेन कुम्भाज्जन्म तपोधन ।<br>
मित्रावरुणयोर्वीर्याद्वसिष्ठस्यानुजोऽभवत् ॥ १९<br>
अगस्त्य इत्युग्रतपाः सम्बभूव पुनर्मुनिः ।

"अग्नीने मर्त्यलोकात अगस्त्य ऋषीच्या रूपाने जन्मास यावे." अशा प्रकारे अग्नि व वायु ह्या दोन देवतांचा मिळून एक असा तो अगस्त्य ऋषी अवतरला आहे; आणि इन्द्राच्या आज्ञेचे पालन म्हणूनच त्याने समुद्रजलाचे पान केले." त्यामुळे अगस्त्य ऋषी हा दुसरा तिसरा कोणी नसून वायुसह असलेला अग्नीच होय. अगस्त्याच्या रूपात असलेल्या अग्नीने समुद्रजल संपविले. अगस्त्य आणि अग्नी ह्यांचे एकरूपत्व मत्स्य पुराणाने व सायणांनी स्पष्टच दाखविले आहे. ह्याच विधानाच्या समर्थनासाठी पुढील गोष्टी देता येतील.

(१) अगस्त्य हा वसिष्ठाचा भ्राता होय. वसिष्ठ = अग्नी हे अन्यत्र सिद्ध केले आहे. त्यामुळे अग्नी (अगस्त्य) हा अग्नीचा (वसिष्ठाचा) भ्राता असणे साहजिक आहे.

(२) इन्द्र आणि मरुत् यांच्यात अगस्त्याने सख्य घडवून आणले. इन्द्र अगस्त्याच्या शब्दाला मान देई असे वर सांगितले आहेच. अगस्त्य=अग्नी. त्यामुळे त्याचे इन्द्र व मरुत् दोघांशी मित्रत्वाचे








नाते योग्यच आहे. इन्द्र-अग्नी, अग्नी-मरुत् यांचे बरोबर केलेले उल्लेख ऋग्वेदात पुष्कळ ठिकाणी मिळतात.

(३) पुराणातील, अगस्त्याने विन्ध्य पर्वताला नमविल्याची कथा प्रसिद्ध आहेच. अग्नीचेच स्वरूप असलेला ऋषी विन्ध्यावरील उंच आणि दाट अरण्ये नष्ट करून विन्ध्याला नमवू शकतो. अशा प्रकारे दाट अरण्ये नष्ट झाल्यानंतर आर्यांना विन्ध्य ओलांडून दक्षिणेकडे उतरणे सुकर झाले. आर्यांच्याकरिता मार्ग करून देऊन दक्षिणेकडे जाणारा अगस्त्य हा प्रथम होय.

(४) अग्निरूप मानला तरच अगस्त्याच्या समुद्रजलपानाची उपपत्ती लागू शकते.

(५) अगस्त्याने इल्वल राजाचा दुष्ट भ्राता वातापि दानव पचविला. अग्निरूपी अगस्त्यच त्या दानवाचे शरीर नष्ट करू शकतो.

(६) 'अगस्त्य' हा शब्द स्वतःच स्वतःचा अर्थ सांगणारा आहे.

अगे = पर्वते स्त्यायते – वर्धते इति अगस्त्यः।

"पर्वतावर पसरणारा" अग+$\sqrt{}$स्त्यै – पसरणे.

शेवटचा मुद्दा स्पष्ट करतो की अगस्त्य = 'पर्वतावरील अग्नी." म्हणूनच त्याला 'कुम्भयोनि' म्हणतात. अग्नीला कुम्भातून आणले. वसिष्ठाला 'कुण्डिन्' म्हणतात. कारण यज्ञवेदीवर पूजिला जाणारा तो असतो.

अशा प्रकारे अगस्त्य = अग्नि असे समीकरण प्रस्थापित केल्यानन्तर आता लोपामुद्रेचे खरे स्वरूप जाणून घेण्याचा प्रयत्न करू.

## ६ लोपामुद्रा—

ऋ. १.१७९ हा पतिपत्नींचा एकान्तातील संवाद आहे असे मानले तर त्यातील अनेक विधाने निरर्थक ठरतात. विशेषतः त्या संवादातील "न मृषा श्रान्तं यदवन्ति देवाः।" हे शब्द लोपामुद्रेला उद्देशून आहेत असे मानले तरी त्यांचे स्वरूप सर्वसामान्य दिसत असून एकान्तातील संवादाचा भाग असल्यासारखे वाटत नाही.

संवादातील शेवटच्या दोन ऋचा ह्या अगस्त्याच्या शिष्याने उच्चारल्या असे मानले जाते. (बृहद्देवता) तो शिष्य म्हणतो. "मी मैथुनास प्रवृत्त झालेल्या ह्या दोघांचे (अगस्त्य लोपामुद्रा) संभाषण ऐकले. हे माझ्याकडून झालेले पापाचरण होय." पुढे त्याची कबूली तो आपल्या गुरूजवळ देतो. तेव्हां गुरू त्याला क्षमा असल्याचे स्मितपूर्वक सांगून त्या पापापासून सोडवितो. ही सर्व बृहद्देवता आणि ऋग्विधान या ग्रंथांनी मागून जोडलेली पुरवणी आहे. ते ग्रंथ अगस्त्याकडे पाहताना लोपामुद्रेचा पति असलेला एक मानव ह्या दृष्टीचा अवलंब करतात.

पण ती दृष्टी मला ग्राह्य वाटत नाही.

'अगस्त्य' म्हणजे 'पर्वतावरील अग्नी' असे ठरत असल्यामुळे 'लोपामुद्रा' ह्या नावावरून ती—अग्नीमुळे जिचे स्वरूप बदलले आहे अशी शेतीची जमीन वा शेतीकरिता तयार केली जाणारी, वणव्याने जिचे स्वरूप बदलले आहे अशी जाळली गेलेली जमीन फार चांगली असते. आर्य आणि दास लोकांना अशा प्रकारच्या भूमीची प्राप्ती पोषकच होय.

निष्कर्ष हा **अगस्त्य** = दावाग्नी आणि

**लोपामुद्रा** = जाळली गेलेली व त्यामुळे स्वरूप बदललेली कृषियोग्य भूमी होय.



अनुक्रमणिका






प्रा. सुशीला पाटील

# ज्ञानेश्वरीतील एक अलक्षित रस-- ब्रह्मरस

‘ वाचे बरवे कवित्व ।
कवित्वीं बरवे रसिकत्व ।
रसिकत्वीं परतत्त्व ।
स्पर्शु जैसा । ’ – अ. १८ ओ. ३४७

बुद्धीचे श्रेष्ठत्व स्पष्ट करीत असताना या ओवीत ज्ञानेश्वरांना अभिप्रेत असणारी वाङ्मयमूल्याची सोपान-परंपरा नकळत व्यक्त झाली आहे. वाचेचे–वाङ्मयाचे –साहित्याचे सर्वश्रेष्ठ अंतिम मूल्य ‘ परतत्त्वस्पर्श ’ आहे हे येथे त्यांनी निःसंदिग्धपणे सूचित केले आहे. संपूर्ण ‘ भावार्थदीपिका ’ या अंतिम मूल्याच्या कसोटी-वर बावनकशी ठरणारी आहे. परतत्त्वाच्या उत्कटत्वाने प्रत्ययास येणारा ब्रह्मरस वा कैवल्यरस हेच ज्ञानेश्वराचे अपेक्षित उद्दिष्ट आहे. या एकाच रसाचे संसूचन त्यांनी ब्रह्मरस,[1] कैवल्यरस,[2] स्वानंदरस[3], स्वानंदभोग[4], अद्वयानंदवैभव[5], प्रतीतिरस,[6] इत्यादि, अनेक शब्दांनी केले आहे. या बरवर भिन्नभिन्न दिसणाऱ्या शब्दातून त्यांना आनंदाच्या एकाच अमृतस्वरूपी अनुभवाचा निर्देश करावयाचा आहे. ज्ञानेश्वरीतील या ब्रह्मरसाचे स्वरूप, अधिष्ठान, स्थायीभाव नि परिणती स्पष्ट करण्याचा हा एक प्रयत्न आहे.

‘ भावार्थदीपिके’तील केवळ वाणीच्या सौंदर्याजवळ, कवित्वाजवळ वा रसिकत्वाजवळ न थांबता या पर-तत्त्वस्पर्शातून ब्रह्मरसाकडे कैवल्यबोधाकडे श्रीकृष्णास अर्जुनाला न्यावयाचे होते. ज्ञानेश्वरांनाही तत्कालीन श्रोत्यास या अर्जुनाच्याच मार्गाने मोहरे लावावयाचे होते. संजयाच्या मुखाने ते म्हणतात–

‘ सहजे ब्रम्हरसाचे पारणें । केलें अर्जुनालागी नारायणें ।
कीं तेचि अवसरीं पाहुणे । पातलों आम्ही । ’
– अ. ६ ओ. २.

प्राचीन मराठी वाङ्मयात ज्ञानेश्वरीचे स्थान अनन्य-साधारण आहे. या वाङ्मयकृतीतील कवित्व आबालवृद्धांना वेड लावणारे आहे. या काव्यातील रसिकत्व रसिकांना गुंगवून टाकणारे आहे आपल्या काव्यकृतीची अनेक वैशिष्ट्ये ज्ञानेश्वरांनी ठायी ठायी

---

१. ‘ सहजें ब्रह्मरसाचें पारणे । केलें अर्जुनालागीं नारायणें । – अ. ६ ओ. २
‘ तियें प्रमेयाचींच हो कां वळलीं । कीं ब्रह्मरसाच्या सागरीं चुबकळिली ’ । – अ. ७ ओ. १८८
‘ तेणें आबालसुबोधे ओवियेचेनि प्रबंधे । ब्रह्मरस सुस्वादें अक्षरें गुंफिलीं ।
– ’ अ. १८ ओ. १७४२

२. ‘ हें असोतु या बोलाचीं ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरिलीं । ’ – अ. ६ ओ. २२
‘ येथ शांताद्भुत रोकडे । आणि येरा रसां पडप जोडे । हे अल्पचि परी उघडे । कैवल्य येथें । ’
– अ. ११ ओ. १२

३. ‘ पार्थु स्वानंदैकरसे । विरेल ऐसा भेददशे ।
आणिला येणे मिषे । प्रश्नाचेनि । ’ – अ. १८ ओ. १५४६

४. ‘ हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीचि देईल ।
सर्वेंद्रियां पोषवील । श्रवणाकरवीं । अ. १८ ओ. १७४७

५. ‘ मग तिही ते शांभव । अद्वयानंदवैभव ।
संपादिलें सप्रभव । श्री गहिनीनाथा । – अ. १८ ओ. १७५६

६. ‘ हें समस्तही श्री वासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो ।
म्हणौनि भक्तांमाजीं रावो । आणि ज्ञानिया जगी । ’
– अ. ७ ओ. १३६








सांगितली आहेत. मूळ भगवद्‌गीतेवर टीका करीत असताना आपल्या टीकेकडेही टीकाकाराच्या दृष्टीने त्यांनी अनेकदा पाहिले आहे. आणि त्यांना जाणवलेल्या रसालंकारादि काव्यगुणांची नि पाल्हाळ–पुनरुक्ति आदि काव्यदोषांची नोंद ज्ञानेश्वरानी ठिकठिकाणी केली आहे.

## रसविषयक उल्लेख

भावार्थदीपिकेला– मूळ गीतेलाही कौरवपांडवाच्या कथेची विशाल पार्श्वभूमी आहे. कथा म्हटली की त्यात विविध रस आलेच ! आपल्या काव्यकृतीतील रसांची जाणीव ज्ञानेश्वरांना होती. संस्कृत साहित्यशास्त्रज्ञांनी मानलेल्या नऊ या रससंख्येला त्यांनीही मान्यता दिली होती.[१] पण त्यातही तरतमभाव स्पष्टपणे दर्शविला होता. शृंगारादि अष्टरस आणि शांतरस यांची तुलना करताना ते म्हणतात –

' जयाचिया बरवेपणीं ।
की जे आठां रसांची ओवाळणी ।
जे सज्जनाचिये आयणी ।
विसावा जगीं ।
तो शांतुचि अभिनवेल ।
ते परियसा मऱ्हाठे बोल ।
जे समुद्राहूनि सखोल ।
अर्थभरित । ' – अ. ४ ओ. २१३-२१४

शांतरसाविषयी गौरवोद्गार काढताना रसराज शृंगाराच्या माथ्यावर पाय देण्याचे सामर्थ्य या शांतात आहे[२] आणि ज्ञानार्त लोकासाठी गीतार्थाच्या निमित्ताने हा शांतरसाचा वर्षावच होतो आहे.[३] असेही त्यांनी मोठ्या अभिनिवेशाने प्रतिपादन केले आहे. पण केवळ शांतरसाच्या आविष्कारातच ज्ञानेश्वरीची परिसमाप्ती नाही.

' इये मराठीचिये नगरी ।
ब्रह्मविद्येचा सुकाळु करी । ' – अ. १२ ओ. १६

– ही ज्ञानेश्वरांची अभिलाषा आहे. ' ऐके द्वैताचा ठाओचि फेडी । ते ब्रह्मविद्या कीजेल उघडी ' ।
–अ. ६ ओ. ११३

-हा वेदान्त त्यांना सामान्य जनांना सांगावयाचा आहे. हे अद्वैत तत्त्वज्ञान सहजासहजी सर्वसामान्य लोकांच्या गळी उतरणारे नव्हते. म्हणून विविध रसांची, अलंकारांची शब्दचमत्कारांची हळुवार बोलाची, लडिवाळ वाचेची अनेक आमिषे त्यांनी आपल्या काव्यग्रंथात सर्वत्र विखरून ठेवली आहेत. या प्रत्येकातील उत्कटता, समर्पकता, हृद्यता पाहून निरखून, अनुभवून रसिक कृतार्थ होतो. पण ज्ञानेश्वरांची झेप फार पुढची आहे. या साऱ्यांचा त्यांनी केवळ साधनमात्र उपयोग करून घेतलेला आहे. या सर्व साधनांच्या आधारे सांगितल्या जाणाऱ्या गीतेच्या अर्थाद्वारे परतत्वस्पर्शाच्या किनाऱ्या-किनाऱ्याने शांतरसाचा वर्षाव करीत ब्रह्मरसाप्रत आपल्या श्रोत्यांकडून त्यांना प्रवास करवावयाचा आहे. आणि याकरता शांतरसाचे सर्वाधिक साहाय्य, त्यांना मिळालेले आहे. म्हणूनच, ' नुसधीचि शांतिकथा– १३–११५५ ', ' शांताचिया घरा–११.२ ', ' वर्षला शांतरसे तो हा ग्रंथु– १८–१७६१ ' अशा शब्दात शांतरसाचा अतिरिक्त गौरव त्यांनी केला आहे.

वस्तुतः भरताच्या आठ रसात शांताला रसपदवी नव्हती. पुढील साहित्यशास्त्रज्ञांनी शांताचे रसत्त्व मानले आणि अभिनवगुप्ताने शांतरस मोक्षफलद असल्याने सर्व रसात श्रेष्ठ आहे.[४] असे म्हणून शांतरसाचा पुरस्कार केला. या शांतरसाचा स्थायी भाव शम असून तो

---

१. ' नाना **नवरस** सुधाब्धि । परिपूर्ण हें । ' – अ. १ ओ. २९
' दैविकी उदार वाचा । जैं उद्देशु दे नाभिकाराचा ।
तैं **नवरस** सुधाब्धिचा । थावो लाभे । ' – १० ओ. ७
' **नवरसां** भरवीं सागरू । ' – अ १२ ओ. ११
' नवरसीं वरिखैन मी । ' – अ. १३ ओ. ११६८

२. ' नुसधीचि **शांतिकथा** । आथिजेल कीर वाक्पथा ।
जे शृंगाराच्या माथा । पाय ठेवी । ' – अ. १३ ओ. ११५५

३. ' मग आर्ताचेनि ओरसे । गीतार्थग्रथनमिसें ।
वर्षला **शांतरसें** । तो हा ग्रंथु । ' – अ. १८ ओ. १७६१

४. ' मोक्षफलत्वेन चायं प्रधानतमः ' ।–अभिनवगुप्त.



अनुक्रमणिका






ज्ञानशक्तीवर अधिष्ठित आहे. 'रसविमर्श–'कार वाटवे यांच्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास– 'शांतरसाची बैठक ज्ञानमार्गाची आहे. त्यांचा उगम वैराग्यापासून होतो. वेदवाक्यश्रवणाने आणि प्रत्यक्ष अनुभवाने नित्यानित्यवस्तुविवेक होतो व मुमुक्षु ब्रह्मसाक्षात्काराच्या मागे लागतो. तेथे ज्ञानच प्रधान असते. भावनांचा संबंध नसतो. उलट शोक, मोह, राग, द्वेष इत्यादि भावना नाहीशा केल्याशिवाय व मन निर्विकार केल्याशिवाय आत्मज्ञान होत नाहीं ' [1] शांतरसाचा स्थायी शम म्हणजे शांती वा समाधान आहे. हे समाधान लौकिक विषयापासून मन आवरून घेण्याने लाभत असते.[2] साहित्यात शमाने येणारी मनःस्थिती हीच शांतरसाच्या दृष्टीने साध्यरूप असते. हे समाधानच उद्दिष्ट असते. विश्वनाथाने तर मनाच्या निरिच्छ अवस्थेमध्ये उत्पन्न होणारे आत्मविश्रामजन्य सुख म्हणजे शम अशीच शमाची व्याख्या केली आहे. [3] साहित्यात साध्य असलेला हा शम वेदान्तात मात्र ब्रह्मप्राप्तीचे केवळ साधन आहे. वेदान्ताने साधनरूप मानलेला शम 'ब्रह्मविद्येचा सुकाळ' करू इच्छिणाऱ्या ज्ञानेश्वरानीही जवळजवळ तसाच उपयोजिला आहे.

## शांतरस–साधन–साध्य–ब्रह्मरस

शांतादि रसाविष्कारापेक्षा ज्ञानेश्वर ब्रह्मप्राप्तीला –कैवल्यप्राप्तीला अधिक महत्व देतात हे –

येथ शांताद्भुत रोकडे । आणि येरां रसां पडप जोडे ।
हे अल्पचि परी उघडे कैवल्य येथ ।' ।

—अ. ११. ओ. १२

–यात स्पष्टपणे दिसते. साहित्यशास्त्रातील केवळ रसविषयकच नव्हे तर भावविषयक परिभाषाही त्यांना परिचित होती. पण वाङ्मयीन रसास्वादाच्या तुलनेत ब्रह्मानंदाची श्रेष्ठताच त्यांच्या मनापुढे सतत तरळत असे. असा निष्कर्ष—

'ऐसा सात्त्विकां आठांही भावा ।
परस्परें वर्ततसे हेवा ।
तेथ ब्रह्मानंदाची जीवा ।
राणीव फावली ।'

— अ. ११ ओ. २५१

–या ओवीवरून काढता येतो. आपल्या ग्रंथाचे अंतिम पर्यवसान त्यांनी परतत्वस्पर्शाने स्फुरणाऱ्या ब्रह्मरसात केले आहे. केवलत्व वा एकत्वबोधजन्य ब्रह्मानंद हे या रसाळ काव्यग्रंथाचे कर्त्याला अभिप्रेत असणारे उद्दिष्ट आहे. वेदांतातील अद्वैत तत्त्वज्ञान जनतेला सांगून त्यांना भावनिष्ठ नव्हे तर ज्ञाननिष्ठ आनंद प्राप्त करून देण्याकरता त्यांच्या भावार्थदीपिकेचा अवतार आहे. एकतत्वबोधातून प्रतीत होणाऱ्या कैवल्यरसात जीवशिवैक्याचा सोहळा व तज्जन्य सुजाण असा उत्कट आनंद त्यांचे लक्ष्य आहे. या आनंदाची जातकुळीच न्यारी आहे. काव्यानंदापेक्षाही वेगळी आहे. काव्यानंद हा ब्रह्मानंदसहोदर असतो हे दंडी, विश्वनाथ वगैरे साऱ्यांनीच मानले आहे. परंतु अभिनवगुप्ताने मात्र शांतरसाचे विवेचन करीत असता रसानुभवाचे योग्याच्या अनुभवाशी असणारे साम्य हेरले. 'रसो वै सः । रस ह्येवायं, लब्ध्वाऽऽनंदी भवति ।' [4] या उपनिषदातील 'रसा'–प्रत साहित्यातील रसांचा विशेषतः शांत रसाचा सूक्ष्म पण निकट संबंध आहे हे अभिनवगुप्ताच्या प्रथम ध्यानात आले आणि शांतरसाच्या विवेचनात त्याने या संबंधावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला. ज्ञानेश्वरांनी मात्र 'रसो वै सः ।' यातील रस व ब्रह्मरस यात एकरूपता कल्पून तीच साध्यरूप मानली.

## अधिष्ठान नित्यानित्यवस्तुविवेक जाणणारी बुद्धी परिणती – परम आनंद

साहित्यातील नऊ रसांचे अधिष्ठान मानवी अंतःकरणातील स्थायी भाव आहेत तर 'ज्ञानेश्वरी'तील ब्रह्मरसाचे अधिष्ठान मात्र नित्यानित्यविवेक जाणणारी बुद्धी आहे. ज्ञानेश्वरीतील शांतरसाची पाऊलवाटही ब्रह्मरसात विलीन झाली आहे. या रसाचा आनंद विवेकाधिष्ठित आहे. विवेकाचे दैन्य नष्ट झाल्यावरच

१. रसविमर्श– के. ना. वाटवे–पृष्ठ २८५.
२. 'शमस्तावत् श्रवणादिव्यतिरिक्त विषयेभ्यः मनसो निग्रहः ।' –वे. सा. खंड ४
३. 'शमो निरीहावस्थायां स्वात्मविश्रामजं सुखम् ।' – साहित्यदर्पण ३. १८०
४. तैत्तिरीयोपनिषत्








प्रा. दि. के. बेडेकरानी 'सर्वात जुनी लघुकथा' असा जिचा उल्लेख केला आहे ती तुकारामांच्या गाथ्यातील कथा अशीच असून अत्यंत मार्मिकतेने आणि चमत्कृतीने शेवटाकडे जाते.

**तुकोबा सांगतात**

" व्याले दोन्ही पक्षी एका वृक्षावरी ।
आला दुराचारी पारधी तो ॥
वृक्षाचिया माथा सोडिला ससाना ।
धनुष्यासि बाणा लावियेले ॥
तये काळी तुज पक्षी आठविती ।
धांवे गा श्रीपती मायबापा ॥
उडोनिया जाता ससाना मारील ।
बैसता विंधील पारधी तो ॥
ऐकोनिया धावा तया पक्षियांचा ।
धरिला सर्पाचा वेश वेगी ॥
डंखोनि पारधी भुमीसि पाडिला ।
बाण तो लागला ससान्यासी ॥
ऐसा तू कृपाळू आपुलिया दासा ।
होसील कोंवसा संकटींचा ॥ "

या कथांतून कुठे ईश्वराचे कृपाळूपण तर कुठे मानवी मनातील स्वार्थ आणि व्यवहारवाद यांचे सुंदर आणि साक्षेपी चित्रण तुकाराम करतात. त्याचवेळी जीवनात 'दुःख पर्वताएवढे' हेही सांगावयास ते विसरत नाहीत. या आणि पुढीलही सर्व कथा म्हणजे मानवी स्वभावाचे लक्षणीय नमुने आहेत. उपरोक्त कथांत पारधी आणि बाबोबा यांच्या रूपाने आलेली संकटे म्हणजे 'मानवीजीवन हे नियतीचे भक्ष्य आहे' असे सुचविण्याचाच प्रयत्न होय. नियतीचे लौकिक रूप पारधी आणि बाबोबांच्या रूपाने वर्णन करण्यामुळे या लोकजीवनाच्या चित्राला अधिक परिपूर्णता लाभली असे वाटते

या अभंगवाणीत अध्यात्म हा एकच एक स्थायीभाव असला तरी हे अध्यात्माचे सूत्रही विविध पदरांनी नटलेले आहे. नाशिवंत, क्षणिक असूनही संसारसुख आणि व्यवहार यांची न सुटलेली ओढ, उलट अविनाशी ईश्वर सोडून विनाशी संसाराच्या अधिकाधिकच आहारी जाणारे मानवी मन आणि त्यांच्या मर्यादा यांचे चित्र तुकाराम तितक्याच तत्परतेने आणि सहजतेने चितारतात. पहा—

" परिसे गे सुनेबाई । नको वेचूं दूध दही
आवा चालली पंढरपुरा । वेसीपासुनि आली घरा
ऐके गोष्टी सादर बाळे । करी जतन फुटके पाळें
माझे हातीचा कलवडू । मजवाचुनि नको फोडू
वळवट क्षिरीचे लिंपन । नको फोडू मजवांचून
उखळ मुसळ जातें । माझे मन गुंतले तेथें
भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा
भक्षी परिमित आहार । नको फारसी वरो सारूं
सून म्हणे बहुत निकें । तुम्ही यात्रेसि जावें सुखें
सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा
सुनमुखीचे वचन कानी । एकोनि सासू विवंची मनी
सवतीचे चाळे खोटे । म्यां जावेसे इला वाटे
आता कासया यात्रे जाऊ । काय जाऊनि तेथे पाहू
मुले लेकरे घरदार । माझे येथेचि पंढरपूर "

लोकजीवनाची अत्यंत प्रातिनिधिक कथा असाच या कथेचा उल्लेख करावा लागेल. मायेत गोविलेल्या ओढाळ मनाची कहाणी, त्याच्या संकल्पाच्या मर्यादा आणि शेवटी ऐहिकतेचा झालेला विजय यांचे चित्रण अत्यंत मार्मिक झाले. 'आवे' सारख्या स्त्रीचित्राच्या द्वारा ही कथा समोर मांडण्यात तुकोबांनी मार्मिकता तर साधलीच पण त्यातील व्यक्तिनिष्ठ विनोदाने तिला अधिक जिवंतपणाही प्राप्त करून दिला. मात्र हा विनोद मानवी जीवनाची विदारक शोभांतिकाच स्पष्ट करण्यात अधिक उपयुक्त ठरला आहे. त्यामुळे हा अभंग ही एक कथा तर आहेच पण त्याला प्रभावी जीवनभाष्याचेही स्वरूप प्राप्त झाले आहे.

प्रत्येक प्राणिमात्र हा मायेत, प्रेमात; स्वार्थाच्या जंजाळात खोल खोल बुडत चालला आहे. एकाच्या खांद्यावरून दुसरा जातो तरीही प्रपंचाची विफलता कुणाच्याच लक्षात येत नाही. सर्व 'झाले कामाचे अंकित' अशी अवस्था आहे. अशांपैकीच एकाची पत्नी एकत्र कुटुंबातील त्रासाबद्दल तक्रार करते. सासू-नणंदेचा छळ व त्रास तिला सहन होत नाही. म्हणून ती नवऱ्यास 'माझ्या अंगसंगे तुम्हासि विश्रांति । मग धडगति नाही तुमची' असे निर्वाणीचे सांगून 'वेगळे निघता संसार करीन । नाही तरी प्राण देते आता' अशी धमकीही देते. पतीही 'कामाचा अंकित' झाल्याने 'सकाळ उठोन वेगळा निघेन । वाहातो तुझी








आण निश्चयेसी' असे आश्वासन देतो, पत्नीचा अनुनय करणारा हा पती तिला –

" वेगळे निघता घडीन देरिचुडा।
तूं तव माझा जोडा जन्माचा की
ताईत साकळी गळांचि दुलडी।
बाजुबंद जोडी हातसर
वेणीचे जे नग सर्वही करीन।
नको धरु सीण मनी कांहीं
नेसावया साडी सेलारी चुनडी।
अंगीची कांचोळी जाळिया फुलें "

अशी सर्व आश्वासने देतो. या सर्व प्रसंगाबाबत 'तुका म्हणे केला रांडेने गाढव। मनासवे धाव घेतलीसे' असा एका चरणात निष्कर्ष काढून तुकाराम मोकळे होतात. मानवी मनाचा अभ्यास, विविध गोष्टींचे सूक्ष्म निरीक्षण आणि त्यातून सहजपणे कथेचे निवेदन, यामुळे तुकोबांचे विवेचन सोपे, सहज आणि अधिक वास्तव झाले आहे, दारिद्र्याने पीडिलेल्या विप्राच्या कथेतही ब्राह्मणाचे मुलाची 'बाहेरी मिष्टान्न मिळे एके दिशी। घेऊनी छंदासी त्याचि बैसे' अशी कारुण्यपूर्ण अवस्था प्राप्त होते. म्हणून ब्रह्मांडनायक वैकुंठ सोडून धाव घेतो व त्याला क्षीरसागर देतो.

स्वार्थाने अंध झालेल्या आणि त्यामुळेच आयुष्यात असंख्य ठिकाणी ठेचकाळणाऱ्या माणसांच्या मनाचे विविध नमुने तुकारामांनी चित्रित केले आहेत. त्याद्वारा कधी सूचकतेने तर कधी स्पष्टपणे टीकेचे प्रहार ते करीत असतात. हे जीवनभाष्य जितके स्वाभाविक तितकेच मार्मिक आणि जितके सुलभ तितकेच अभ्यास-पूर्ण असे वाटते. हे सर्व प्रसंग व व्यक्ति नित्याच्याच जीवनातल्या आहेत, नित्यानुभवांच्या बाहेर तुकोबा कुठेही जात नाहीत. या स्वार्थातून आणि ओढाळपणा-तून दांभिकता, मानवी मनात जन्म घेते. तुकारामांना दांभिकतेची मनस्वी चीड असल्यामुळे ते 'मोजून माराव्या पैजारा' अशी परखड भाषा वापरतात. पण त्याचवेळी हा दंभ ज्या अज्ञानातून जन्माला आला आहे त्याच्या तळाशी जाऊन बसलेला माणूस प्राण्याची शेवटी त्यांना कीवच येते. पोटासाठी 'वरतें करोनियां तोंड। हाका मारितो प्रचंड' असा माणूस तुकाराम नेमका हेरतात आणि,

" टिळा टोपी माळा देवाचे ग बाळे।
बागवी बेगळे पोटासाठी ॥
तुळसी खोवी कानी दर्भ खोवी शेंडी।
लटिकी धरी घोंडी नासिकाची ॥
कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे।
प्रेमेविण डोळे गळताती ॥
तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद।
त्यापाशी गोविंद नाही ' नाही '

असे त्यांचे उपहासाने वर्णन करतात. 'उरी लावी उर आळंगिता कांता। संतासी भेटतां अंग चोरी' अशी असंख्य माणसे भेटतात. पण शेवटी या सर्वांना सरावलेले तुकाराम 'तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावे। स्वभावा करावे काय कोणीं' असा पैलकडील निष्कर्ष काढून या सर्वांना पोटांत घेतात. अश्रद्धेत बुडून वासनाधीन झालेल्या माणसाचे पुढील वर्णन लक्षणीय वाटते–

" तारुण्याच्या मदें न मनी कोणासी।
सदा मुसमुसी खुळी जैसा
अठोनी वठोनी बांधला मुंडास।
फिरतसे म्हैसा जनामधी
हाती दीड पान वरतीच मान।
नाही तो सन्मान भक्तियांसी
श्वानाचिया परी हिंडे दारोदारी।
पाहे नरनारी पापदृष्टी
तुका म्हणे ऐसी थोर हा गयाळी।
करिता टवाळी जन्म गेला "

– अशा पद्धतीची बरीच वर्णने तुकोबांच्या अभंग-वाणीत कधी तपशीलाने तर कधी साक्षेपाने, कधी उपहासाने तर कधी विनोदाच्या आधारे आली आहेत. ढोंगी शिष्याला लागलेल्या समाधीचे (?) वर्णनही (अ. ७९० पृ. १४६) असेच आहे. कोणत्याही एका मार्गाने नीट जाऊ देत नाही या परंपरागत समाजवैगुण्याची तक्रार तुकारामांनीही केली आहे :

" बहु बोलो जाता म्हणति हा वाचाळ।
न बोलता सकळ म्हणती गर्वी
लग्न करू जाता म्हणति हा मातला।
न करिता जाला नपुंसक "

– असे या समाजसंसाराचे त्रांगडे आहे. म्हणून त्याला 'त्यजुनिया भक्ति करा' असाच सल्ला ते देतात.








अंतरंगी असलेली भक्तीची ओढ आणि विठाई माऊलीचे आपल्या भक्ताकडे सदैव असणारे लक्ष याबद्दलचे विवेचन करीत असताना तुकोबा आईच्या वात्सल्याचा दृष्टांत देतात. त्यातून आईचे चित्र साक्षात् डोळ्यासमोर उभे रहावे असे आहे:

" न लगे मायेसी बाळे निरवावे ।
आपुल्या स्वभावें ओढे त्यासी
मज का लागला करणें विचार ।
ज्याचा जार भार त्याचे माथां
गोड धड त्यासी ठेवी न मागतां ।
समाधान खाता नेदी मना
खेळता गुंतले उमगूनी आणी ।
बैसोनिया स्तनीं लावी बळें
त्याच्या दुःखेपणे आपण खापरी ।
लाही तळी वरी होय जैसी
तुका म्हणे देह विसरे आपुला ।
आघात तो त्याला लागो नेदी "

' नाही जाले ज्ञान पाहिलें अक्षर ' असे स्वतःबद्दल म्हणविणाऱ्या तुकोबांनी रेखाटलेली ही व्यक्तिचित्रे पाहिली म्हणजे आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. म्हणून तुकाराम केवळ संत होते असे वाटत नाही. मानवी स्वभावाचे सखोल ज्ञान, जीवनाचा चौफेर अनुभव, सूक्ष्म निरीक्षण आणि थोडक्यात अधिक आशय व्यक्त करण्याचे सामर्थ्य, या गुणांना प्रचीतीच्या बोलाची जोड मिळाल्यामुळे त्यांच्या संतत्वात रांगड्या का होईना पण कलावंताचाही पिंड होता असे वाटल्याशिवाय रहात नाही.

पूर्वसुकृतावर तुकोबांचा भरंवसा आहे. आजच्या जीवनातले दुःख हाही त्याचाच परिपाक आहे. पण हा रुक्ष विषयसुद्धा तुकाराम फक्त सहा चरणात दोन व्यक्तिचित्रे रेखाटून सोपा तर करतातच पण त्याला मनोरंजकताही प्राप्त करून देतात व आपले जीवनविषयक तत्त्वज्ञान हसत खेळत वाचकाच्या गळी उतरवतात.

" हीनवर बीजवर दोघी त्या गडणी ।
अखंड कहाणी संसाराची
माझा पति बहु लहान चि आहे ।
खेळावया जाय पोरांसवें
माझे दुःख जरी ऐकशील सई ।
म्हातारा तो बाई खोकतसे
खेळे सांजवरी बाहेरी तो राहे ।
वाट मी वो पाहे सेजेवरी
पूर्व पुण्य माझे नाही बाई नीट ।
बहु होती कष्ट सांगों काई
जवळ मी जाते अंगा अंग लावू ।
नेदी जवळ येऊ कांटाळतो "

आणि म्हणून तुकाराम ' पूर्व सुकृताचा हा चि बाई ठेवा । तुका म्हणे देवा काय बोल' अशी आपली समजूत घालतात. स्वसंसाराची शोकान्त कथाही तुकारामांनी मन पिळवटावे अशाच पद्धतीने सांगितली आहे, वृथा पाल्हाळ कुठेही न आणता ' होईल उशीर आता पुरे ' या जाणिवेने आत्मकथेला आणलेला आटोपशीरपणाही तुकारामांची निवेदनदृष्टी स्पष्ट करतो.

तुकारामांच्या गाथेत आलेल्या श्रीकृष्णांच्या लीळा, (अभंग २०९, ३९४, ४३८, ४२३५ ते ४२४२) बालक्रीडेचे अभंग, सीतेचा शोक (३३९), भक्तप्रल्हाद (३०९० ते ३०९६), दुर्वासाची बळीस प्रार्थना (३०९७ ते ३१०५), दामाजी कथा (४३५६) आदी पौराणिक संदर्भही कथारूपच आहेत. त्यातील श्रीकृष्ण, सीता, प्रल्हाद, दामाजी आदी व्यक्तिरेखा अत्यंत ठसठशीत अशा रेखाटल्या आहेत या सर्व कथांचा चित्रमयता हा एक खास विशेष म्हणावा लागेल. हे पौराणिक संदर्भही आले आहेत ते ईश्वरलीलावर्णनामुळेच. तरीही या कथांशी एकरूप होऊन तुकोबा हे प्रसंग साकार करतात. व्यक्तिचित्रे अगोदर माहीत असतानाही नवी वाटतात, त्यात जिवंतपणा येतो, प्रसंगात उत्कटता जाणवते. कालियामर्दनाच्या प्रसंगनिर्मितीत तर भव्यतेची आणि रेखीवपणाची जाणीव तीव्रतेने होते. निवेदनाचा संक्षेप हे तुकारामांच्या शैलीचे खास वैशिष्ट्य म्हणावे लागेल आणि या संक्षेपाला जोड मिळाली आहे बहुअर्थप्रसवा शब्दयोजनेची.

तुकारामांच्या गाथेत आढळून येणाऱ्या या कथा तीन प्रकारात विभागता येतात. पहिल्या प्रकारात वर प्रथम उल्लेखिलेल्या हरिण, पक्षी, कोल्हा, विप्र आदींच्या कथा मोडतात. त्यात संदर्भाच्या निमित्ताने








आलेली कथानके आणि त्यासोबत सहज घडलेले व्यक्तिदर्शनही येते. दुसरा प्रकार केवळ व्यक्तिचित्रांचा होऊ शकेल. एका अर्थी त्यांना शब्दचित्रे म्हणायलाही हरकत नसावी. यात जवळून पाहिलेला समाज त्यातील भिन्न भिन्न प्रवृत्तींचे दांभिक, स्वार्थी आवेशारख्या स्त्री-पुरुषांचे विविध आणि वेधक नमुने तुकाराम चित्रित करतात. तिसऱ्या प्रकारात त्यांनी श्रीकृष्णकथा प्रसंगोपात्त वर्णिल्या आहेत. पैलथडीचे जड व रूक्ष अध्यात्म या सोप्या, मनोरंजक व लोकजीवनातून निवडलेल्या कथांमुळे ऐलथडीच्या मोक्षासारखे वाटल्याशिवाय राहत नाही.

शेवटी एका गोष्टीचा पुनः उल्लेख केला पाहिजे. हे सर्व कथानिवेदन अभिव्यक्तीच्या दृष्टीने नेणिवेतले असले तरी ते रंगविण्याची तुकारामांची इच्छा निश्चितच असावी असे वाटते. कारण तुकारामांचा मनःकोष सामाजिक आणि सांसारिक अनुभवानी इतका ओतप्रोत भरलेला होता की त्याचे आविष्करण होणे अपरिहार्य वाटते. त्यात कलाकुसर, नाजुकपणा, कथा सजविण्याची दृष्टी कदाचित तितकीशी नसेलही. पण जीवनाचा अर्थ रांगडेपणाने का होईना पण तो व्यक्त करण्याइतकी मार्मिकता निश्चितच आहे. समोर धगधगणारा जीवनकलह आणि त्यात जळणारा मनुष्यदेह ते पाहत होते. स्वतःही बरेचसे जळाले होते, करपले होते. या धगधगत्या ज्वालांच्या प्रकाशात ती जीवने रंगवून आपल्या मनाचा दाह इतरेजनांसमोर मांडणे हा त्यांचा हेतू असावा, तीच त्यांची शांती असावी; आणि त्यासाठी कुणाचीही पर्वा न करता 'नाही भ्यालो लोकां चतुरांसि ' अशा पावित्र्यात ते उभे होते असे वाटते.

---





अनुक्रमणिका






डॉ. प्रभाकर भा. मांडे

# कृषि-जीवनाशी संबंधित यातुक्रिया आणि इतर विधीः

एखादे वर्षी पाऊस न पडल्यास किंवा कमी पडल्यास खेड्यातील जीवन विस्कळित होते. लोकांना काम (मजुरी) मिळेनाशी होते. लोक हवालदिल होतात. पाऊस पडावा म्हणून प्रत्येकजण देवाला नवस करतो. काही तोडगे देखील करण्यात येतात. एक तोडगा असा : पाऊस न पडल्यास महाराच्या घरची खापराची घागर आणून त्यात तुळशीवृंदावनातील महादेव घालतात, व सार्वजनिक किंवा खाजगी उकिरड्यामध्ये त्या घागरीला पुरतात. असे समजतात की देव संकटात पडल्यामुळे लवकर पाऊस पाडतो.

देवाला संकटात घालण्यासाठी त्याला पाण्यात भिजत ठेवणे इत्यादी उपाय योजिले जातात. गावात महादेवाचे मंदिर असल्यास त्याची मोरी बंद करून गाभारा पाण्याने भरतात. पाऊस येईपर्यंत देवाला अशा पद्धतीने पाण्यात कोंडण्याची पद्धती अनेक गावात रूढ आहे. गंगेच्या कावडी भरून आणून गावच्या मारुतीला स्नान घालणे (त्यात वैशिष्ट्य असे की गंगेवरून आणलेल्या या कावडी जमिनीवर कुठेच टेकवीत नाहीत), वेशीला लोंढा येईपर्यंत गावातील एखाद्या देवावर पाणी घालणे, नामसप्ताह करणे, अभिषेक करणे इत्यादी अनेक प्रकार केले जातात.

गावातील काही मुले किंवा मुली निंबाचे डहाळे डोक्यावर व कंबरेस बांधून त्याचप्रमाणे घागरमाळा किंवा बैलाच्या गळयातील घंटा बांधून पाणी मागतात. यावेळी एकाच्या हातात निंबाच्या डहाळयात उलटी बेडकी टांगतात. घरोघर अंगावर पाणी ओतून घेत पाणी मागतात. धान्यदेखील गोळा करण्यात येते. पाणी मागताना लहान मुलांनी अंगावरील सर्व वस्त्रे काढून नागव्याने पाणी मागावे अशी रूढी काही गावात आहे. यावेळी निरनिराळया गावात निरनिराळी गाणी म्हणण्याचा प्रघात आहे. त्यापैकी काही ओळी अशा –

– ‘दगडाचा देव। पाणी मोठा येव ॥’

– ‘मेघराजा पाणी दे, साळी दाळी पिकू दे।’

– ‘आधी रोटी बंगाल मे पाणी आया जंगल मे।’

– ‘पाणी आला सळकधारी,
पाणी आला सळकधारी।
कुणब्याच्या शेतावरी, कुणब्याच्या शेतावरी ॥
कुणबीदादा हारीक झाला, येठण घेऊन घरी आला,
येठण लावले खुंटीला, सांगू लागला नारीला,
आणली बाजरी तासोतासी ॥’

– ‘आडगड आडगड पिकू दे, दळणाभर पाणी दे,
जमीन सूकी बैल भूका, मेघराजा पाणी दे ॥’

‘धोंड्या धोंड्या पाणी दे, दाळ साळ पिकू दे।’

– ‘धोंडीबाई धोंडी, धोंडी गेली हाटा,
पाऊस आला, मोठा,
धोंडीच्या भाकरी भिजल्या,
आमच्या कण्या शिजल्या,
भिजू द्या ग भिजू द्या, चारा पाणी पिकू द्या,
खंडीभर दाणा पिकू द्या ॥’

–मुसलमानाची मुले संध्याकाळच्या वेळी उघडे नागडे होऊन हातात जळत असलेल्या उदबत्त्या घेऊन पाणी मागत घरोघर फिरतात. लोक त्यांच्या अंगावर पाणी टाकून त्यांना ओले करतात, पाणी मागताना ते खालीलप्रमाणे म्हणतात–

– ‘जंगल सूखा, बैल भूका, अल्लामियाँ पाणी दे,
भाजी रोटी खाने दे, अल्लामिया दे बती,
बनिये के मुह मे भर मिट्टी,

– ‘पाऊसपाणी आबादाणी,
कण्याचे मडके कणकण भरी,’

काही गावात स्त्रियांनी डोक्यावर पाणी ओतून घेऊन पाणी मागण्याची प्रथा आहे. या स्त्रिया गावातील प्रतिष्ठित माणसाना पाण्याने भिजवतात व त्याच्याकडून धान्य वसूल करतात. पाणी मागून जमा केलेल्या धान्याचा विनियोग देवकार्यातच करावयाचा असतो.

पाणी मागण्याची आणखी एक लोकविलक्षण पळत एका स्त्रीने सांगितली. रात्री गावातील २५-३० स्त्रियांनी वेशांतर करून किंवा बोंगड्या घेऊन पाणी मागत हिंडावयाचे असते. त्यांच्याबरोबर एक जागल्या असतो. या स्त्रियांना प्रकाश दाखवू नये किंवा ओळखू नये असा निर्बंध असतो. या स्त्रिया अत्यंत कर्कश स्वरात–

– ‘या येशीकडून आल्या अन्
त्या येशीकडे गेल्या गऽबायांनो’

–‘वऱ्हलाकडून आल्या अन्
खाल्लाकडं गेल्या गऽबायांनो.’

– असे विव्हळून म्हणतात. गावातील प्रतिष्ठित माणसांना बाहेर बोलावून त्यांना भिजवण्याची रूढी सर्वत्र आढळते.

औरंगाबाद जिल्ह्यात सर्व लोकांबरोबर नवबौद्ध लोक पानदेवाला पाणी मागतात. भाद्ऱ्याचा सण साजरा केल्यावर दहा दिवसांच्या आत पाऊस पडतो अशी समजूत आहे.

### अतिवृष्टी झाल्यास करावयाचे उपाय

पाऊस न पडल्यास जसे वर सांगितल्याप्रमाणे तोडगे करण्यात येतात त्याचप्रमाणे पाऊस जास्त झाल्यास म्हणजे ओला दुष्काळ पडण्याची भीती निर्माण झाल्यास काही विधी करतात. काही स्त्रिया 'एका नवऱ्याच्या दोन बायका' पऱ्हाळाला उलट्या टांगतात. या बाहुल्यांना काळा, पिवळा रंग देऊन एक बाहुली ( नवरा ) सोयीची व दोन बाहुल्या (बायका) उलट्या टांगतात. काही स्त्रिया आपल्या घरातील लहान मुलास नागवे करून त्याच्या हातात वरवंटा देतात. या वरवंट्यास पोतेरे ( चूल सारवण्याचे फडके ) बांधतात. मुलाला भिजेपर्यंत पावसात उभे करतात. काही ठिकाणी पावसाला पोळण्याचा कार्यक्रम करण्यात येतो. पाऊस चालू असता तव्यावर जळते निखारे ठेवून तो तवा पावसात ठेवतात. यालाच पावसाला पोळणे असे म्हणतात. तुपाचा दिवा लावणे, कुमारी मुलीने पाऊस पडत असताना जमिनीवर तेल ओतणे इत्यादी रूढी प्रचलित आहेत. मद्रासमध्ये कुरूप स्त्री हातात पेटलेला टेंबा घेऊन पावसात नाचते, काही ठिकाणी पाटावर अगस्तीचे चित्र काढून तो पाट पावसात ठेवण्याची प्रथा आहे. काही लोक भिंतीवर अगस्तीचे चित्र काढून त्याला पावसाच्या पाण्याने भिजवतात. पंजाबात कुत्र्याच्या कानात कढत तेल टाकून त्याला पावसात सोडतात. आंधळ्याचे नाव घेऊन अकरा उडदाचे दाणे एका फडक्यात बांधून पावसात टाकतात. एका लाकडाच्या ठोकळ्याला साठ छिद्र करून त्यांतून दोरा ओवून एकत्र बांधण्यात येते या क्रियेला पावसाला बांधणे असे म्हणतात. पत्रावळीवर दहीभात ठेवून ती पत्रावळ चौरस्त्यावर ठेवण्याची पद्धती उत्तर हिंदुस्थानात रूढ आहे. पावसालादेखील दृष्टिपिशाच्याची बाधा होते अशी उत्तर हिंदुस्थानातील लोकांची समजूत आहे.

वरीलपैकी काही प्रथांमध्ये पाऊस पडण्यासाठी बेडकास उलटे टांगून त्यावर पाणी टाकण्याची पद्धति आहे. याची थोडीशी पार्श्वभूमी ऋग्वेदांमधील ऋचांत आढळते–

'About thirty hymns of Rigweda are not concerned with the worship of gods or deified subjects. Some twelve of these, nearly all occuring in the last book, are magical in character, like these of Atherwaveda, such as spells directed against disease. *One of them is addersed to frogs–as bringers of rain.*[१]

यावरून बेडकाचा व पावसाचा संबंध प्राचीन आहे असे दिसते.

### जगातील इतर भागांत प्रचलित असलेल्या रूढी :

मराठवाड्यांत प्रचलित असलेल्या या रूढींचे साम्य जगातील इतर भागात प्रचलित असलेल्या प्रथांशी आहे. पाऊस पडावा म्हणून ज्या क्रुती केल्या जातात त्यांत पाण्याचे थेंब पाडणे, तोंडाने मोठमोठ्याने आवाज करणे या क्रिया प्रमुख आहेत. रशियात पाऊस जर लवकर पडला नाही तर तीन माणसे झाडावर चढतात. त्यांपैकी एक माणूस ढोलके वाजवून मेघांच्या गडगडण्याची नक्कल करतो. दुसरा हातात जळत्या मशाली घेऊन हलवतो, व बीज निर्माण झाल्याचा आभास निर्माण करतो. आणि तिसरा झाडावरून पाणी फेकतो. अवर्षण जाऊन पाऊस पडावा म्हणून अलास्का येथील स्त्रिया आणि मुली विवस्त्र होऊन गावाच्या सीमेपर्यंत जातात आणि तेथे पाणी शिंपडतात. न्यू गिनीमध्ये पाण्याची चूळ घेऊन ती आकाशात फेकून पावसाची नक्कल करण्यात येते. जावा बेटात पाऊस पडताना होणाऱ्या ध्वनीसारखा ध्वनी नारळांची पाने हलवून केला जातो. त्याचप्रमाणे नारळांच्या पानांच्या साहाय्याने आकाशात पाणी उडवतात. उत्तर अमेरिकेतील आदिवासी मध्यभागी पाण्याचे भांडे ठेवून त्याच्या भोवती नृत्य करतात. असे नृत्य करताना तोंडात पाणी

१. – A. A. Macdonell – India's Past; Page. 36








घेऊन आकाशाकडे गुळणी करतात. शेवटी भांड्यातील पाणीदेखील आकाशाकडे फेकतात. त्यामुळे पावसात जसे थेंब जमिनीवर पडतात तसे थेंब पडून पावसाची नक्कल होते. असे केल्याने धनधान्य समृद्धी होते अशी समजूत आहे. उत्तर अमेरिकेतील दुसऱ्या एका आदिवासी जमातीत पाऊस पाडणारे किंवा पाऊस मागणारे लोक नृत्य करून व तोंडातून पाणी फेकून मेघगर्जनेसारखा आवाज करतात. अशाच प्रथा आफ्रिकेत देखील रूढ आहेत. बाहुमा या आफ्रिकेतील आदिवासी जमातीत पाऊस मागणारा माणूस एका भांड्यात पाणी घेऊन त्यात एक धोंडा टाकतो व पाण्यात एका विशिष्ट झाडाची पाने आणि काळ्या मेंढीचे रक्त मिळविण्यात येते. तोंडाने मंत्रोच्चार करीत व विशिष्ट झाडाच्या फांदीने आकाशाकडे पाणी शिंपडीत तो पाणी मागत फिरतो. या क्रियेत काळा दगड व काळी मेंढी याविषयी कटाक्ष असतो. फ्रेजरच्या मते मेघांचा काळा रंग व पाऊस पडण्याची क्रिया यांची ही नक्कल आहे. अल्जीरियामध्ये देखील तोंडाने पाणी उडवित देवाची प्रार्थना करण्याची पद्धत रूढ आहे. ऑस्ट्रेलियात पाऊस मागणारा तळयावर जाऊन काही मंत्र म्हणतो व तोंडात चूळ घेऊन सर्व दिशेने फेकतो. ऑस्ट्रेलियात पाऊस पडावा म्हणून ज्या क्रिया करतात त्यात केसांचा वापर देखील केला जातो. केस पाण्यात बुडवून नंतर त्या केसांना जोरात हलवितात. त्यामुळे पाण्याचे तुषार चहुंकडे पडतात. ज्या दिशेकडून पाऊस येण्याची शक्यता असते त्या दिशेकडे केस तोडून फेकण्याची प्रथादेखील ऑस्ट्रेलियात रूढ आहे. काही ठिकाणी केसांना जाळणे ही क्रिया पाऊस पाडण्यास समर्थ आहे असे गृहीत धरून केस जाळण्यात येतात.[१]

### नग्नतेचा पाऊस मागण्याशी संबंध

मराठवाड्यात पाऊस मागण्याचे जे विधी प्रचलित आहेत, त्यांत अंधाऱ्या रात्री स्त्रियांनी पुरुषांना पोषाख घालून व इतर कोणासही दृष्टीस न पडता कर्कश ओरडत जाण्याची रूढी आहे. असे म्हणतात की पूर्वी स्त्रिया नग्न हिंडत असत व पाणी मागत असत. नग्नतेचा पाऊस मागण्याशी संबंध असल्याचे जगातील सर्व भागात दिसते. सर्व्हियामध्ये एक मुलगी विवस्त्र होऊन व फुलाचा पोषाख करून गावातील प्रत्येक घरासमोर नृत्य करून पाणी मागते. घरातील स्त्रिया तिच्या अंगावर पाणी टाकून तिला ओले करतात. नृत्य करताना ही मुलगी पाऊस पाडण्याविषयी देवताना प्रार्थनागीते म्हणते. रशियामध्ये पाऊस पडावा म्हणून मांजर आणि कुत्रा या प्राण्यांना बळी देतात. मांजराला रशियन लोक पवित्र मानतात व कुत्र्याला सर्वात अपवित्र समजतात. सर्वात पवित्र व सर्वात अपवित्र अशा प्राण्यांना बळी देऊन देवताना संतुष्ट केल्याने पाऊस पडतो अशी त्यांची समजूत असते.[२] हे आणि असे विधी लक्षात घेतले तरी नग्नतेचा पाऊस मागण्याशी संबंध जवळ जवळ सर्वत्र दिसतो. नग्न होऊन करावयाच्या विधीचे स्पष्टीकरण करताना क्रान्चे म्हणतातः

'The nudity of the woman represents their utter poverty And inability to give more to conciliate the god of rain' क्रूक यांनी त्यांच्या 'The Folklore of north India' या ग्रंथात नग्नतेचे स्पष्टीकरण करताना म्हटले आहे–

'It may possibly be based on the theory that spirits dread indecency, or rather the male or female principles.' ते पुढे म्हणतात–

'This may be the origin of words and acts practiced at the 'Holi' and 'Kajari' festivals in upper India. which are both closely connected with the control of the weather.[३]

होळी, कजारी इत्यादी सणांमध्ये जी अश्लीलता येते तिचे क्रूक यांनी दिलेली कारणमीमांसा अमान्य करून देखील पिशाच्चांना किंवा दैवीशक्तींना भीती

१. – J. Frazer – The Golden Bough.

२. – W. Crooke – The Popular Religion and folklore of Northern India Vol. I Chapter I

३. – किता.



अनुक्रमणिका






दाखविण्यासाठी वरीलप्रमाणे उपाययोजना केली जात असावी हे त्यांचे मत मान्य करण्यासारखे आहे.

अवर्षण पडले असता पाऊस पडावा म्हणून विधी रूढ ओहत त्यांत स्त्रियांचा भाग विशेष असतो. १८७३-७४ साली गोरखपूर विभागात दुष्काळ पडला होता. तेव्हा पाऊस पडावा म्हणून तेथील स्त्रियांनी रात्रीच्या वेळी नग्न अवस्थेत नांगरणी केल्याची नोंद आहे. हे कृत्य पुरुषांनी पाहू नये असा संकेत आहे. पुरुषांनी पाहिले तर त्याचा परिणाम होत नाही अशी समजूत आहे. मिर्झापूर जिल्ह्यात १८९२ साली पाऊस पडला नव्हता तेव्हा असाच विधी तेथेही करण्यात आला. एका न्हाव्याच्या स्त्रीने रात्रीं सर्व स्त्रियांना बोलाविले. शेतकऱ्यांच्या तीन स्त्रियांनी नागवे होऊन त्यांपैकी दोघीनी बैलाप्रमाणे नांगर ओढला व एकीने नांगराची मूठ धरली. व त्या सर्वांनी वरुण देवाची प्रार्थना केली. या स्त्रियांच्या ओट्या भरण्यात आल्या. या सर्व विधी-मध्ये आता हळूहळू बदल होत आहेत. आता स्त्रिया नग्न होऊन हे विधी करीत नाहीत. मात्र अजूनही अंधाऱ्या रात्री स्त्रियांनी वेशांतर करणे, त्यांना पुरुषांनी पाहू नये हा संकेत पाळणे इत्यादी गोष्टी प्रचलित आहेत

### प्राचीन प्रथा :

प्राचीन काळी ग्रीक व रोम या देशात Zens ज्युपिटर हा पावसाचा देव समजला जात असे. पाऊस मागणारा माणूस (rain maker) ओक वृक्षाची डहाळी पाण्यात बुडवून ज्युपिटरची प्रार्थना करीत असे. रोममध्ये ज्युपिटरची लहान प्रतिमा Tiber मध्ये ठेवून प्रार्थना करण्याची पद्धती प्रचलित होती. ट्युटोन लोक हे पाऊस पडावा म्हणून नग्न मुलीच्या अंगावर पाणी शिंपडतात. हिब्रू जमातीच्या लोकांमध्ये समाजाने कायद्याचे पालन केले की त्याच्या उत्तरात देव पाऊस वेळेवर पाडतो आणि माणसांनी पाप केले तर देवाजवळ असलेला पाण्याचा साठा तो देत नाही अशी समजूत होती. भारतातील बुद्ध भिक्षु पाऊस न पडल्यास मंदिराच्या शिखरावर, किंवा वर छिद्रे असतील तर त्यातून, पाणी टाकीत असत आणि प्रतीकात्मक पद्धतीने पाऊस पाडीत असत. नागदेवता पाऊस पाडण्यास समर्थ असतात अशी देखील समजूत आहे. नागदेवतेची मिरवणूक काढण्याची प्रथा दक्षिण अमेरिकेत रूढ आहे. सेल्टिक लोक एक मिरवणूक काढून पवित्र विहिरीजवळ किंवा यातुशक्ती असलेल्या झऱ्याजवळ जाऊन पाण्याच्या पृष्ठभागावर छडीने प्रहार करीत असत. असे केल्याने पाऊस हमखास पडतो अशी समजूत आहे.[१]

### प्राणी आणि पाऊस :

काही प्राणी पाऊस आणतात अशी समजूत मराठवाड्यात प्रचलित आहे. ही समजूत जगातील इतर भागांतही दिसून येते. बेडूक, सरडा, साप हे प्राणी वरुणाचे लाडके समजले जातात. काही दगड पाऊस पाडण्यास समर्थ असतात असे मानले जाते. अशा दगडावर जसे गारगोटी, लाल दगड, शिरगोळा यांच्यावर पाणी शिंपडणे, त्यांना पाण्यात बुडवून ठेवणे इत्यादि क्रिया केल्या जातात. टिटवी ओरडली असता पाऊस पडतो अशी आयर्लंड मध्ये समजूत आहे. मुंग्यांच्या वारुळाची तोंडे बंद झाली तरीही पाऊस येतो असे समजतात. बदक रात्री ओरडले किंवा बेडूक ओरडले तर पाऊस पडतो असे मानतात. या व्यतिरिक्त मुंगळयांना पंख फुटणे हे पाऊस येण्याचे चिन्ह आहे असे समजतात.

### राजा आणि पाऊस

राजा हा निसर्गावर अधिसत्ता गाजवणारा शक्तिमान पुरुष अशी कल्पना प्राचीन काळात रूढ होती. राजा हा दैवी शक्तीने युक्त असतो अशा समजुती प्रचलित होत्या, हे होकार्ट यांनी अनेक दाखले देऊन त्यांच्या Kingship या ग्रंथात दाखविले आहे.[२] राजा हा यातुशक्तीने भरलेला असून तो पाऊस पाडू शकतो, धनधान्य समृद्धी करू शकतो, नदीला पूर आल्यास त्याला थांबवू शकतो, वादळाला रोकू शकतो वगैरे समजुती जगातील सर्व देशांतील लोकांमध्ये रूढ होत्या असे फ्रेझर यांनी म्हटले आहे. राज्यात पाऊस पडला नाही तर राजा हा व्रतवैकल्ये करून पाऊस पाडतो अशा समजुती अजूनही काही ठिकाणी आहेत.

राजामध्ये दैवी शक्ती असते अशी समजूत मराठवाड्यात परवापर्यंत होती. सध्या जिवंत असलेल्या

१. - Standard Dictonary of folklare. Vol. II Page 921.
२. - A. M. Hocart - The kingship; Page. 34









निझामाचे वडील मेहबूबउद्दौला यांच्याविषयी अनेक दंतकथा सांगितल्या जातात. एकदा राज्यात ( भूतपूर्व हैद्राबाद संस्थानात ) दुष्काळ पडला असता मेहबूब राजाने बीदरच्या मशिदीत प्रार्थना केली, तीन दिवसांचा उपवास केला तेव्हा पाऊस पडला असे सांगितले जाते. राज्यात पाप फार झाले तर पाऊस पडत नाही असे म्हातारी माणसे म्हणतात.

साधुसंत त्याचप्रमाणे पीरमुरशद यांनी देवाला साकडे घातल्यावर पाऊस पडतो असे समजतात.

### वनवासाला जाणे

अवर्षण पडले असता वनवासाला जाण्याची एक वैशिष्ट्यपूर्ण रूढी मराठवाड्यात रूढ आहे. गावातील काही लोक पोत्यांचे कपडे अंगावर घालून रानात जातात. सर्वसाधारणपणे त्यांनी चौदा दिवस अरण्यात व्रतस्थ राहावयाचे असते. भिक्षा मागून उदरनिर्वाह करावयाचा व जमिनीवर झोपावयाचे असा नियम असतो. वनवास संपल्यावर त्यांची मिरवणूक काढली जाते. अशा रीतीने वनवासाला गेल्याने पाऊस पडतो ही समजूत रूढ आहे.

### या रूढींचे यात्वात्मक स्वरूप

येथपर्यंत आपण मराठवाड्यात त्याचप्रमाणे जगातील इतर भागात प्रचलित असलेल्या पाऊस मागण्यासाठी तसेच पाऊस थांबवण्यासाठी करण्यात येणाऱ्या निर्धींचे स्वरूप पाहिले. या सर्व प्रथांची काही समान वैशिष्ट्ये सांगता येतील. मराठवाड्यात मृगराजाची प्रार्थना करण्यात येते. मृग हे पावसाचे पहिले नक्षत्र आहे. त्याने प्रसन्न होऊन पाऊस पाडावा यासाठी ही प्रार्थना असते. ग्रीक आणि रोममध्ये पावसाचे दैवत ज्युपिटर याची उपासना केली जाते. भारतात वरुण देवाची पूजा करतात.

पाऊस मागण्याच्या क्रियेशी काही प्राण्यांचा संबंध असतो जसे बेडूक, सरडा, मुंगी, मुंगळा, नाग वगैरे; हे प्राणी पाऊस आणतात अशी समजूत याच्या मुळाशी आहे.

पाऊस मागण्याच्या ज्या रूढी मराठवाड्यात इतरत्र प्रचलित आहेत त्यात अंगावर पाणी शिंपडून घेणे, ओले होणे, पाऊस पडण्याची नक्कल करणे या प्रमुख आहेत. या सर्व रूढींचे स्वरूप सादृश्यानुगामी यातुक्रियेसारखे आहे. म्हणजे या सर्व यातुक्रिया आहेत असे म्हणता येते.

पावसाला पिशाच्चबाधा झाल्यामुळे पाऊस पडत नाही अशी समजूत असल्यामुळे ही पिशाच्चबाधा घालवण्यासाठी काही तोडगे केले जातात. स्त्रियांनी नग्नावस्थेत करावयाचे विधी या स्वरूपाचे आहेत असे दिसते.

समाजात पाप वाढले म्हणजे पाऊस पडत नाही अशा समजुतीने पापांचे निरसन केले जाते. वनवासाला जाणे, देवांना संतुष्ट करणे, राजाने सर्वांच्या वतीने क्षमा मागून प्रार्थना करणे या क्रियांच्या मुळाशी पापक्षालनाचा हेतु असावा.

राजा, साधुसंत, पीर वगैरे यातुशक्तीने युक्त असतात असे समजतात. या व्यक्तींनी पावसाला पाचारण केल्यास पाऊस पडतो अशी श्रद्धा असते.

एकंदरीने या सर्व क्रियांचे स्वरूप सूक्ष्मपणे पाहिल्यास असे दिसते की येथील समाजाचा या रूढींवर नितांत विश्वास असतो. या कृती केल्याने पाऊस हमखास पडतो किंवा अतिवृष्टी असल्यास पाऊस थांबतो असे त्यांना वाटते. यांच्या साहाय्याने आपणास इष्ट असा परिणाम साधू शकतो यावर त्यांची श्रद्धा असते. या सर्व क्रिया यात्वात्मक क्रिया आहेत असे म्हणता येते. सादृश्यानुगामी यातुक्रिया, प्रतीकात्मकता असे या क्रियांचे स्वरूप स्पष्टपणे जाणवते.

### कृषि-जीवनाशी संबंधित यातुक्रिया :

पाऊस न पडल्यास किंवा अतिवृष्टी झाल्यास ज्याप्रमाणे काही यातुक्रिया केल्या जातात, त्याचप्रमाणे अधिक धान्य पिकावे, समृद्धी व्हावी, पिकांवर आलेली रोगराई दूर व्हावी यासाठी मराठवाड्यात काही क्रिया केल्या जातात. त्यापैकी काही प्रमुख रूढी खालील-प्रमाणे आहेत. खालील विवेचनात मराठवाड्यात वापरले जाणारे काही खास शब्द दिले आहेत.

१ मृगाचा पाऊस पडला तर 'पळयाची' म्हणजेच कापसाची पेरणी 'मोघ्याने' सवाष्ण स्त्रियांकडून करवून घेतात. अशा रीतीने पेरणी करणारी स्त्री 'लेकुरवाळी' असावी असा कटाक्ष असतो.

२ कापूस पिकला नाही तर रब्बीची पेरणी कापूस मोडून करण्यात येते. अशी पेरणी करण्यापूर्वी शेतात








हळद, कुंकू तसेच, सोन्याची काडी टाकून शेताची स्त्रीच्या हाताने पूजा करण्यात येते. ती पूजा करणारी स्त्रीदेखील ' लेकुरवाळी ' असावी असा संकेत आहे.

३ बाजरीच्या पिकावर ' वसाया ' नावाचा रोग पडला तर एखाद्या रजस्वला स्त्रीच्या हस्ते त्या उभ्या पिकाची पूजा करण्यात येते. ' वसाया ' रोगाने कणसाला आलेला फुलवरा झडतो व कणसाला दाणे भरत नाहीत. रजस्वला स्त्रीने पूजा केली असता रोग जातो असा विश्वास असतो.

४ धान्याची रास तयार झाल्यावर राशीवर दृष्टि-पिशाच्चाचा परिणाम होऊ नये म्हणून त्यावर गायीचे शेण ठेवतात.

५ राशीसमोर कोंबडे किंवा बकरे बळी दिले जाते. त्याला ' रासुंडा ' असे म्हणतात.

६ राशीसमोर सवाष्णीच्या हाताने पूजा करून पाण्याने भरलेला घट ठेवण्यात येतो. या घटात सुपारी, पैसा वगैरे टाकतात. नंतर ' आतील कण्या ' खाऊन नंतरच रास मोजतात.

७ काही शेतात म्हसोबा असतो. असे म्हणतात की म्हसोबाला नारळ फोडून संतुष्ट केल्याशिवाय त्या शेतात वाहणीची गाडी चालतच नाही. (म्हणजेच गाडीचे चाक फिरत नाही.)

८ खळे कापण्याच्या वेळी ' मेंढीलाली ' मेढ रोवण्याच्या आधी हळद, कुंकू, बिंदा, सुई, ऊद वगैरे टाकून त्याची पूजा केली जाते. मेढ सौंदडीचीच असावी असा कटाक्ष असतो.

९ गव्हाची मळणी असेल तर मेंढीवर गव्हाची पेंढी बांधतात व ज्वारीची असेल तर ज्वारीची वाकडी कणसे बांधतात.

१० राशीच्या खाली ' परीस ' ठेवतात. हा ' परीस ' म्हणजे एक दगड किंवा लोखंडाची पहार असते. रास मोजताना परिस दिसू नये याची काळजी घेण्यात येते. असे केल्याने रास जास्त भरते असे म्हणतात. ' परीस ' उघडे पडले तर रास कमी भरते असे समजतात.

११ बैलाला किंवा कोणत्याही प्राण्यास सरणफोड झाला किंवा पोटशूळ झाले तर त्याला नम्र होऊन उपरण्याच्या किंवा पटक्याच्या पीळ घालून त्याच्या केलेल्या तोब्याने मारतात. पोटशूळ थांबते असे म्हणतात.

### स्त्री आणि सुपीकता

अशा आणखी कितीतरी प्रथा आहेत. यात काही गोष्टी चिंतनीय आहेत. अधिक धान्य यावे म्हणून स्त्रियांच्याकडून तेही सवाष्ण व पुत्रवती स्त्रियांकडून पूजा करून घेण्याची पद्धती किंवा यासारख्या इतर पद्धती जगातील अनेक भागात आहेत. संपन्नतेचा किंवा सुपीकतेचा आणि स्त्रियांचा संबंध सर्वत्र रूढ आहे. आदि मानवाला प्रजोत्पादनाची किंवा सुफलीकरणाची ( Power of fertility ) एक गूढ शक्ती धारण करणाऱ्या स्त्रीबद्दल भीती आणि आदर वाटला. मानव शेती करू लागल्या-नंतर त्याला जमिनीतील उत्पादनशक्ती आणि स्त्रीचे उत्पादन शक्ती यात विलक्षण साम्य दिसले. त्यामुळे उत्पादनाचे काम स्त्रियाच करू लागल्या. स्त्री आपल्या प्रजोत्पादनाच्या सामर्थ्याने जमिनीची सुपीकता वाढवू शकते ही कल्पना प्रसृत झाली. आजकाल देखील स्त्रीमधील प्रजोत्पादनाच्या गूढ शक्तीमुळे ती जमिनीची सुपीकता वाढवू शकते. अशा कल्पनेने स्त्रियांकडे पेरणी वगैरेसारखी कामे सोपविली जातात. वेली किंवा झाडे लावावयाची असली तर तीदेखील स्त्रियांच्याकडून लावून घेतली जातात.[७] कारण–

' A fruitful woman makes plant fruitful, a barren woman make them barren '.

–या समजुतीमुळे झाडे किंवा वेली लावण्याची कामे किंवा सुपीकतेसाठी करावयाच्या यातुक्रिया या सवाष्ण आणि विशेषतः पुत्रवती स्त्रीने करावयाच्या असतात.

मराठवाड्यात रजस्वला स्त्रीने बाजरीचा रोग जाण्यासाठी पूजा करणे ही प्रथा मात्र वैशिष्ट्यपूर्ण आहे. याचे समाधानकारक स्पष्टीकरण देता येत नाही. परीस राशीखाली ठेवणे ही एक यातुक्रिया आहे असे दिसते. या क्रिया प्रतीकात्मक ( symbolic ) आहेत. त्याबरोबरच पिशाच्चांना दूर करण्यासाठी आणि देवतां संतुष्ट करण्यासाठी विधी केले जातात.

––

७. – J. Frazer – The Golden Bough Page. 28, 29.








प्रा. ब्रह्मानंद श्रीकृष्ण देशपांडे

# भांड--एक संशोधन

एकनाथ महाराज म्हणजे महाराष्ट्रशारदेचे हृदयच. हा संतश्रेष्ठ सर्वांशाने आणि सर्वांशाने मराठी समाजाशी एकरूपत्व पावला होता. देववाणीतील ज्ञान लोकभाषेत आणूनच ते थांबले नाहीत तर हे ज्ञान समाजातील सामान्यातिसामान्य लोकांपर्यंत पोचविण्याचे महान कार्य त्यांनी केले. यातूनच त्यांच्या भारुडांचा उदय झाला आहे. भारुडं ही लोकगीतच पण ह्या माध्यमातूनच नाथांनी अध्यात्मगंगा वाहविली. त्यांनी 'वासुदेव' रचला. 'पांगुळाच्या' स्वरांनी समाजाला हाकारले 'निर्गुणाचा' वेळू रचून कोल्हाटीण नाचविली– रंगाला आणली. सासुरवाशिणीच्या जळफळाटातून क्रोध आणि अहंकार याच्या नाशासाठी आदिशक्तीला रोडगे वाहण्याचे नवस केले. 'बाजीगर आणि हंडीबाग' यांचा खेळ करून कामक्रोधके जीवडे भयंकर असल्याचे लोकांच्या निदर्शनास आणले. 'कौलनामे' 'अर्जदास्त' 'अभयपत्रे' लिहून 'देहपुरीच्या ठाण्याची' बंदोबस्ती केली. महार आणि ब्राह्मण, हिंदु आणि तुर्क यांचे संवादही त्यांनी रंगविले. जोहार, सिद्दा, नानक, मानभाव, बाळसंतोष, फकीर सरोदा, दिवटा, मुका असं अब्द अब्द त्यांनी लिहिले

आणि याच समूहात मला आगळा असा एक भारुड-विशेष आढळला आणि तो म्हणजे भांड. श्री. साखरे महाराजांच्या एकनाथी गाथेत एकूण तीन भांड नाथांचे दिलेले आहेत. त्यातील एक नमुन्यादाखल पुढे देत आहे.

माया छांड सुनोजी. अच्छा भांड बनोजी ॥ धृ ॥
ब्रह्मदेवने वेद पठाया माया मिठी लागी
सरस्वतीके गले पडा उसकी कोरत भागी ॥ १ ॥
विष्णुके पीछे लगा है मायाका धंदा
खेल करते फिसल पडा मिठी लागी वृंदा ॥२॥
महादेव बडा देव सब देवनका बाबा
भिल्लीनी के पीछे लगा करता तोबा तोबा ॥३॥
अहिल्याकू देखनेकू इंद्र भूले मदे
गौतमने गांड मारी आंगपर हुवे फोदे ॥४॥
सीताकी चोरी करी रावणकूं धक्का
हनुमानने नंगी करके जलादियी लंका ॥५॥
हनुमान तो ब्रह्मचारी जपे रामनाम
स्त्री राज्यमो बायका गाभन करता है बेफाम ॥६॥
विश्वामित्र तप करे हुए अनुष्ठानी
मेनकाकू वश हुए हुयी धूलधानी ॥७॥
नारदने किसनसे एक औरत मांगी
नारदकी नारदी भयी पोंगडे जनन लागी ॥८॥
सोला सहस्र नारी कान्हा गोकूलमे खेले
राधिकाकूं छोडकर रीसनीकू भूले ॥९॥
जनार्दन सांई मेरा सब खेल खेला
एकनाथ भांड होकर उनके चरण मिला ॥१०॥

नाथांच्या भांड ह्या भारुड प्रकाराची कल्पना यावी म्हणून हा भांड उद्धृत केला आहे. कवि अच्युताश्रम आणि माधवाश्रम यांच्या काही संपादण्या मराठवाड्यातील प्रख्यात संशोधक डॉ. यू. म. पठाण ह्यांनी 'प्रतिष्ठान' मासिकांत छापल्या आहेत त्यातीलही चार पांच संपादण्या नाथांच्या भांड धर्तीच्याच पण नाथांच्या भांडापेक्षा ज्यास्त बीभत्स व अश्लील आहेत. (प्रतिष्ठान औरंगाबाद)

–अर्थात् भांड हा काव्यप्रकार बराच लोकप्रिय होता असे दिसते. परंतु भांड म्हणजे काय ? त्याचे स्वरूप कोणते ? वासुदेव, बाळसंतोष, डौरी, पांगुळ किंवा सरोदा ह्यांच्या प्रमाणेच भांड हीसुद्धा लोकरंजन करून जगणारी जमात होती काय ? ह्या प्रश्नांचा मागोवा घेत असता हाती आलेली माहिती सादर करीत आहे.

माझ्या मते 'भांड' या नाथांच्या भारुडविशेषाचे मूळ स्वरूप संस्कृतातील 'भाण' या नाट्यविशेषात असावे. संस्कृतात भाण हा प्रकार दशरूपकांपैकी अेक आहे तसाच तो नृत्यप्रकारांपैकीही अेक आहे. संस्कृत-







साहित्यात चार भाणांचा अेक संग्रह ' चतुर्भाणी ' या नावाने प्रसिद्ध आहे आणि त्यांत धूर्तविटसंवाद, पादताडितकम्, पद्मप्राकृतकम् आणि उभयाभिसारिका हे चार भाण संगृहित केले आहेत. याशिवाय शृंगारभूषण भाण, शृंगारतिलक भाण, शृंगारमंजरी भाण, लीलामधुकर भाण, शृंगारसर्वस्व भाण, रससदन भाण, मुकुंदानंद भाण, कर्पूरचरित भाण इत्यादि अनेक भाण प्रसिद्ध आहेत. भाण शब्दाचा पहिला प्रयोग आपल्याला बृहदारण्यकोपनिषदात सांपडतो ( यावान्संवत्सरस्तमेतोवनः कालस्य परस्तादसृजत तं जातमभिव्याददात्स भाण करोत्सैव वागभवत ... १–२.४. ) प्रा. मनकड ( दि टाईप्स ऑफ संस्कृत ड्रामा ) ह्यांच्या मतें भाण हा आद्य नाट्य प्रकार आहे. आणि तोही नृत्य प्रकारांतून विकास पावला असावा. उपर्युक्त ग्रंथातील पृष्ठ १५१ वर पुढील तक्ता दाखविलेला आहे.




[भाणिका हाही अेक स्वतंत्र प्रकार असून कामदत्ता, वीणावती वगैरे भाणिका संस्कृत साहित्यात प्रसिद्ध आहेत ]. भाण ह्या प्रकाराचे स्वरूप थोडक्यात दिग्दर्शन करायचे झाले तर ते असे होईल.

(१) भाण हा सर्वस्वी अेक पात्री प्रयोग असतो. बहुधा तो सूत्रधार, नटी, नांदी, भरतवाक्य इत्यादि अपचारांपासून मुक्त असतो.

(२) यातील नायक हा विट किंवा पीठमर्द असतो व तो संस्कृत भाषेचाच प्रयोग करतो. प्राकृत भाषेचा प्रयोग अपवादादाखल एक दोन ठिकाणी सांपडतो.

(३) या नाट्यप्रकाराला एकच एक व सुसंबद्ध असे कथानक नसते. विट हा बोलण्याच्या भरात १०-१५ कथानकेही सांगून जातो व ती सर्व वेश्या व त्यांचे प्रेमिक या संबंधीच असतात.

(४) विट हा अेकटाच रंगमंचावर असतो इतर पात्रांची व त्यांच्या बोलण्याची कल्पना तो आकाश भाषितांनी आणून देतो व तो एकाच वेळा ४ ते १६–१८ नायिकांना भेटून त्यांच्याशी बोलतो. ह्या बहुधा वेश्याच असतात. तो आपल्या मित्रांशीहि बोलतो. परंतु ह्यापैकी कोणीही प्रत्यक्ष रंगमंचावर येत नाही. रंगमंचावर विटच इतर पात्रांच्या भाषणाची कल्पना करून त्यांच्याशी संवाद करतो.

(५) विटाच्या बोलण्याचा विषय नेहमीच शृंगारिक असतो. त्याचे स्वतःचे किंवा मित्राचे प्रेमप्रकरण, वेश्या, त्यांच्याशी वागण्याच्या पद्धति ह्यासंबंधी तो बोलतो, मधुन मधुन तो एडक्यांच्या व कोंबड्यांच्या झुंजी, द्वंद्वं, इंद्रजाल प्रयोग यांचेबद्दलही बोलतो. सकाळ संध्याकाळची वर्णने, नायिका वर्णन ह्याचाही ह्यात अंतर्भाव असतो.

(६) भाणाचे स्वरूप हे सामान्य जनांच्या (पृथग्जनः) करमणुकीसाठीच असते. यात श्रीकृष्णचरित्र वर्णन करावे असा संकेत आहे. मुकुंदानंद भाणात विट आणि कृष्ण यांचे ऐक्यही दाखवले आहे. पण प्रामुख्याने वेशवाट आणि त्याचे वर्णन हा स्थायीभाव असतो. शृंगार हा प्रमुख रस असतो. हास्य व वीर रसही प्रसंगोपात्त रंगविण्यात येतात. असे हे भाणाचे स्वरूप आहे. याचेकडे व एकनाथ महाराजांच्या 'भांड' ह्या भारुड प्रकाराकडे लक्ष्यपूर्वक पाहिल्यास असे आढळून येईल की भाण आणि भांड ह्या दोहोत संज्ञासादृश्यापेक्षा आणखीहि जास्त साम्य आहे. भाणाप्रमाणेच भांड हाही एकटाच असतो. बाजीगर, गारुडी किंवा मुरली ह्यांचेप्रमाणे त्याला साजिंद्यांची गरज नसते. भाणातील विट उत्तान शृंगारिक बोलतो तर भांड हा अश्लील आणि बीभत्स बोलतो. (एकनाथांचा उपर्युल्लेखित ' भांड ' पहा ) पुढे संस्कृतला दैन्यावस्था आल्यानंतर व समाजातील रसिक श्रीमंत वर्ग मुसलमानी आक्रमणाने चिरडला गेल्यानंतर रंगभूमीवरील आपले मानाचे स्थान विसरून ' भाण ' रंगवणारे हे विट रस्त्यावर येऊन लोकांची सवंग करमणूक करु लागले असावे. उत्तर पेशवाईतील दिमाखदार शाहीर पेशवाईच्या पडत्या काळात मुंबईतील तुंदिलतनु सावकारावर लावण्या रचून पोट भरू लागले त्यातलाच हा प्रकार. आणि त्या भाण निवेदकांनाच पुढे भांड हे नाव प्राप्त झाले असावे. नाथांनी जशी कानफाटे, वासुदेव, पांगुळ, जोशी, मुरळी, सरोदा, बाळ-



अनुक्रमणिका

संतोष, डौरी, बाणेगर, कोल्हाटीण ह्या लोकांची करमणूक करून पोट भरणाऱ्या लोकांवर त्याच्या व्यवसायातीलच परिभाषा घेऊन अध्यात्मिक भारुडे रचली तशीच ती भांडावरहि रचली आहेत ही गोष्ट वरील विधानाला बळकटी आणते. प्रसिद्ध मुसलमान संत शेखमहंमद याच्या "योग संग्राम" या ग्रंथातही भांडाचा उल्लेख येतो. तो उद्बोधक व भांडाच्या मूळ स्वरूपावर ( = नट ) प्रकाश टाकणारा आहे तो असा–

हे चित्तवृत्ती नसता अनुरागी ।
जटाजूट भस्म लावितील अंगी ।
जैसे भांड विनटले योग्याचे सोंगी
तदन्याय त्यांचा असे ॥

प्रसंग ५ वा ओवी ५७ वी ॥

–योग संग्राम कर्त्याला भांडाच्या मूळ रूपाची भाणनिवेदकाची कल्पना होती. भाण निवेदक– विट हा वेशवाटातील दर्दी व अनेक वेश्यांशी संबंध ठेवणारा असतो ( पहा. D. R. Mankad. The Types of Sankrit Drama page 152-153 ) अगदी हेच वर्णन शेख महंमदाने भांडासाठी वापरले आहे.

रांडेचा लाडका कल्पने आधीन ।
पारोशा तोंडे नेणे नामस्मरण ।
सद्‌गुरु कृपेवीण बोडकेपण ।
भांड निगुरी म्हणती ॥ प्रसंग. ४. ओवी ६१.

– होळकरांच्या कैफियतीतही 'आम्ही काही भांडभवाई करून दौलत मिळविली नाही' असा उल्लेख येतो. येथे भांड आणि भवाई या दोन करमणूक प्रकारांची एकत्र उल्लेख आहे. पण भवाईचा भांडाशी किंवा भाणिका या प्रकाराशी काही संबंध नाही. भवाई हा प्रकार गुजरातेत विशेष रूढ आहे. Cultural History of Gujerat ह्या पुस्तकाचे कर्ते मजमूदार यांचे मत असे की भवाई हा शब्द 'भाव' पासून आला असावा. भाव हे सूत्रधाराचे नांव आहे भवाईमध्ये अंबा देवीच्या दिव्य कृत्यांचे वर्णन असते. भवाईमधील काही 'वेष' मदमूदारांनी नोंदवले आहेत ते असे– अर्धनारीश्वर, रामलक्ष्मण, कालिक, वामनस्वरुप, चतुर्भुज, गोरखमढी, कहानागोपी इत्यादि. (उपर्युक्त ग्रंथ पृष्ठ. २२४). भांडाचा उल्लेख परशुरामाच्या लावण्यातही सांपडतो पण तेथे तो आळशी व कामचुकार नवऱ्याला बायकोने शिवी म्हणून वापरलेला शब्द आहे. ज्ञानेश्वरीतही भांड हा शब्द स्तुतिपाठक या अर्थाने येतो (अ. १८. ओवी ८०४).

मोगलाच्या दरबारातही भांड होते व ते बादशहाची व सरदारांची करमणूक करीत असत. त्यांच्या हजरजबाबीपणाचे व अक्कलहुशारीचे काही प्रसंगही प्रस्तुत लेखकास तो सागर (म. प्र.) येथे शिकत असता ऐकावयास मिळाले होते. ते समग्र देण्याचें हे स्थळ नव्हे. पण त्यातूनही भांडाचे मूळ रूप 'नट' होणे हे प्रगट होते. उदा. एका मिजासखोर दरबारी कवीची फजिती करण्यासाठी भांडाने वाघाचे सोंग काढले. इत्यादि

अशा प्रकारे 'भांड' ह्या रूपाने संस्कृत नाटकाचेही मूळ रूप असलेला 'भाण' हा प्रकार टिकून राहिला आहे.










## वाचकांचा पत्रव्यवहार–

### माघमासे गवामिव

लोकमान्य टिळकांच्या संशोधनात्मक टिपणांचे एक पुस्तक प्रकाशित आहे. त्याचे नाव 'वेदिक क्रॉनॉलॉजी आणि वेदांग ज्योतिष' त्यात महाभारतातील खालील दोन श्लोक 'माघमासे गवामिव' या ज्योतिषविषयक उल्लेखाने लक्ष वेधून घेतलेले दिसतात. ते श्लोक असे.

अर्जुनस्य इमे बाणाः नेमे बाणा शिखंडिनः
कृतंति मम गात्राणि माघमासे गवामिव ॥

भीष्म १२०-६४

गृहस्नेहावबद्धानां नराणामल्पमेधसाम्
कुस्त्री खादति मांसानी माघमासे गवाइव ।।

शां. १३९-८८

भारताच्या भाषांतरकारास उपरोक्त दोन्ही श्लोकांमध्ये माघमासेगवामिव या पदांचा अर्थ करतांना ज्योतिषाचा भास झाला नाही. त्यांनी केलेला अर्थ माघमासे गवा असे दोन शब्द या समासांतील धरून केलेला आहे. महाभारतातील या दोन श्लोकांचा सामान्यतः अर्थ असा आहेः- हे बाण शिखंडीचे नसून अर्जुनाचे आहेत आणि ज्याप्रमाणे खेकडीच्या पोटातील तिचे पिलू तिचीच आंतडी कुरतडते त्याप्रमाणे माझ्या गात्रांना हे कुरतडत आहेत.

घराच्या स्नेहाने बद्ध झालेल्या मंदबुद्धि माणसाचे मांस, ज्याप्रमाणे खेकडीचे पिलू आपल्या आईचे मांस खाते त्याप्रमाणे कुस्त्री खात असते.

लोकमान्य टिळकांनी यांचा संग्रह, आपल्या टिपणात करतांना या प्रचलित अर्थापेक्षा आणि तोही ज्योतिषाच्या दृष्टीने निराळा अर्थ करण्यासाठी केला आहे हे समजणे चूक होणार नाही. अर्थात त्यांना या वचनाची चर्चा ऋग्वेदांतील 'अघासु हन्यन्ते गावः' या ज्योतिषविषयक उल्लेखाबरोबर करावयाची होती असे त्यांच्या टिपणांवरून दिसते. ऋग्वेदात हा उल्लेख १०-८५-१३ मध्ये आलेला आहे. त्यात अघा शब्दाचा अर्थ मघा नक्षत्र घेऊन मघावर गाई हाणल्या जातात किंवा पाऊस पडतो असा केला जातो.

लोकमान्यांच्या टिपणांत नमूद झालेले हे साम्य श्री. अ. ज. करंदीकर यांनी आपल्या 'ऋग्वेदांतील देवतांचे अभिनव दर्शन' या पुस्तकांत कारणी लावले आहे. त्यांनी महाभारतांतील समासाचा विग्रह माघमासे गवामिव असा करून त्यात ज्योतिष कामी लावण्याचा प्रयत्न केला आहे.

या टिपणांत अघासु हन्यन्ते गावः आणि माघमासे गवामिव या दोन्ही वचनातून निघणारा ज्योतिषपर अर्थ हा भिन्न राहील ही एकवाक्यता नव्हे, हे दाखवावयाचे आहे.

भीष्म आणि अर्जुन यांच्या संदर्भात आजोबा –नातवाच्या लढाईत शरपंजरी पडलेल्या भीष्माच्या तोंडी जन्मदात्या खेकडीला मारून टाकणाऱ्या तिच्या पिलाचे उदाहरण यथार्थ वाटते. माघ महिन्यात हाणल्या जावयाच्या गाईंचा दाखला येथे तितकासा लागू होत नाही. दुसरे म्हणजे कालसंकेताच्या दृष्टीने माघ महिना आणि मघा नक्षत्र हे एक नव्हेत. टिळकांनी आपल्या ओरायन मध्ये कृत्तिकादि नक्षत्रात्मक वैदिक वचनांचा प्रपंच करतांना ही नक्षत्रे सौर घेतली आहेत. त्यांशी सुसंगति राखावयाची म्हटली तर मघा नक्षत्र हे सौर धरूनच अघासु हन्यन्ते या वचनाचा उपयोग करावा लागेल. सौर मघा नक्षत्र म्हणजे माघ महिना नव्हे. दोघात अर्ध वर्तुळाइतके स्थानांतर आणि सहा सहा महिन्यां इतके कालांतर असते. तेव्हा कै. लोकमान्य टिळकांनी सूचित आणि श्री. करंदीकरांनी विस्तारित हा अनुबंध बरोबर वाटत नाही. तसेच माघमा+सेगवा या पदच्छेदा ऐवजी माघमासे+गवा हा पदच्छेदही पटत नाही.

-- भा. रं. कुलकर्णी



अनुक्रमणिका








# पुस्तक समीक्षा –

## श्री. ब. मो. पुरंदरे यांचे
## ' राजा–शिवछत्रपति '

हा एक अंतर्बाह्य अतिसुंदर ग्रंथ आहे. मुखपृष्ठावर अष्टभुजा भवानीचे छत्रपति शिवाजीसह सुंदर रंगीत चित्र आहे. गुळगुळीत कागदावर सुंदर स्वच्छ टाईप, ग्रंथात देवादिकांची, व शिवचरित्रातील प्रासंगिक, रेखीव आकर्षक चित्रे, ग्रंथाची भाषातर फारच अमृतमय व आलंकारिक असली तरी अत्यंत सुबोध नानाविध युक्त्या व पराक्रम करणारा शिवाजीसारखा चरित्रनायक, व त्याचे वर्णन करणारे श्री. बळवंतराव मोरेश्वरराव पुरंदरे, जे शिवाजीस जागृत देव मानतात, निःसीम भक्त अर्थात भक्तिरसाने ओथंबलेल्या अंतःकरणातून निघालेले शिवचरित्र वर्णन. असे हे मणिकांचनसंयोगाचे मूर्तिमंत सौंदर्य ग्रंथात प्रतीत होते ! ग्रंथ हजार पृष्ठाचा दोन भागात विस्तारलेला आहे. प्रत्येक भागाची किंमत २१ रुपये असलीतरी हा ग्रंथ हातोहात विकला गेला ! इतक्यातच त्याची चौथी आवृत्ती निघाली ! यावरून हा ग्रंथ किती लोकप्रिय झाला याचे अनुमान सहज होते. ग्रंथ हातात घेतल्यावर पूर्ण वाचल्याशिवाय मिटावासा वाटतच नाही. हाच अनुभव मलाही आला. या ग्रंथात नुसते शिवाजीचे चरित्रच नाही, तर महाराष्ट्र संस्कृति दर्शविणारे **' इये मऱ्हाटीचिये नगरी,' ' ईश्वरनिष्ठांची मांदियाळी, ज्ञानेश्वराचे पसायदान, तुकारामाची विट्ठलभक्ति, व समर्थांचे राजकारणी बोल,** यांच्या उताऱ्यानी ग्रंथास शोभा आणलेली आहे ! आरंभीच –

" **उदो उदो जगदंबे ! तुझा उदो उदो !**

हे मऱ्हाटी स्तोत्र दिले आहे. याप्रमाणे हा ग्रंथ शाहिरीथाटाचा झाल्यामुळे यास ' शिवाजीचे पुराण ' हे नावही सार्थ होऊ शकेल तरी प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी आधारग्रंथांचीही नोंद केली आहे. यात बखरी, शिवभारत अशा ग्रंथांचे ज्यास्त आधार आहेत.

इ. स. पूर्व २०० ते इ. स. १२७१ पर्यंत महाराष्ट्र वैभवाच्या शिखरावर होता, असे ग्रंथकार म्हणतात, त्यास आधार दिसत नाही. ते म्हणतात " महाराष्ट्र विठ्ठलप्रेमाने भरून गेले होते " खात्रीने विठ्ठलप्रेम इ. स. पूर्व २०० वर्षात नव्हते. ' विठ्ठल ' प्रेमाची इमारत ज्ञानेश्वराने उत्पन्न केली असाही एक समज आहे. " ज्ञानेश्वरे रचिला पाया " वारकरी पंथाचा पाया ज्ञानेश्वराने रचला असावा असे म्हणण्यास काही आधार नाही. ' ज्ञानेश्वरी, ' अथवा ' अमृतानुभव ' या ग्रंथात ' विठ्ठला'चे नावही नाही. त्यांच्या वडिलांचे नाव विठ्ठलपंत होते, पण त्या नावाचाही उल्लेख ज्ञानेश्वरीत नाही. सकारणच ते वडिलापेक्षा आपल्या वडीलभावास गुरुस्थानी मानीत होते. अभंगकार ज्ञानेश्वर ही व्यक्ती वेगळी असली पाहिजे. या व्यक्तीचे व नामदेवाचे सख्य. व दोघेही वारकरी पंथाचे होते. ' एकनाथानेही वारकरीपंथास थोडेसे उचलून धरले. तरी त्यात ब्राह्मण अत्यल्प होते व सध्याही आहेत. त्या वेळेस व आताही देशातील ९०% श लोकही वारकरी पंथाचे नाहीत, म्हणून ' महाराष्ट्र विठ्ठल प्रेमाने भरुन गेला होता ' हे ग्रंथकाराचे मत अतिशयोक्त आहे.

महाराष्ट्रावर पहिली मुसलमानाची स्वारी १३०० मध्ये झाली, त्या वेळेस राजाराम देवराव राज्य करीत होता. व तो अगदी गाफिल, व बेजबाबदार होता असे ग्रंथकार म्हणतात. आणि पुढे म्हणतात ज्ञानदेव, निवृत्ति नामदेव हे संत उत्तरेकडील यात्रेस गेले, तेव्हा तेथील सुलतानाचा जुलूम त्याना पहावयास सापडला आणि ते परत आल्यावर, त्यानी राजास सावध केले तरी तो बेसावधच राहिला ! " हे ग्रंथकार कशाच्या आधारावर लिहितात म्हणून पाहू जाता तळटीपेत कुठेच आधार दिसला नाही.

आमच्या संतानी उत्तरेत यात्रा केल्या असतील, पण कशाचाच उल्लेख ते लेखी करीत नाहीत ! त्यात राजकारण तर या संतांना अगदी वर्ज्य होते ! शिवाजी पूर्व तीनशे वर्षे महाराष्ट्र जो गुलामगिरीत होता म्ह० इ.स. १३०० पासून १६०० पर्यंतच्या महाराष्ट्रात अनेक ' कवि ' व ' संत ' झाले. पण कोणीही इस्लामी राज्याचे जुलूम वर्णन केले नाहीत ! त्यातून वारकरी पंथाच्या संतांनी तर त्यासंबंधी ब्रही काढला नाही ! ' तुकाराम ' व ' रामदास ' समकालीन. पण समर्थ रामदासांनी समाजात ' प्रस्तुत ' ' यवनाचे बंड । हिंदू उरला नाही चंड । ' म्हणून जी राजकीय जागृती केली, त्याच्या शतांशही तुकारामाने आपल्या काव्यात केली

नाही. त्यानी धार्मिक व सामाजिक ढोंगांचा परिस्फोट केला, पण सुलतानी जुलूम चुकूनसुद्धा दाखविले नाहीत.

'एकनाथांचे वाङ्मय विपुल व बहुविध आहे. आणि महाराष्ट्रात त्यावेळेस मुसलमानी अंमल फार जोरात होता. जुलूम होतच होते पण एकनाथाच्या वाङ्मयात एका शब्दानेही त्याचा उल्लेख नाही. रामायणात पौराणिक राक्षसांचे जे वर्णन आहे तेच त्यानी मराठीत आणले आहे आणि हे वर्णन यावनी सुलतानी जुलमाचेच आहे. असे आमचे विद्वान यातून समाधान करून घेण्यास पण अशा ओव्याही दोन तीनच सापडतात!

नाही म्हणायला आमच्यातील इतिहासज्ञ श्री. न. र. फाटक मात्र मराठी संतांना व आद्य संत श्री ज्ञानेश्वरमाउली याना थोर राजकारणी मानतात!

ते आपल्या 'ज्ञानेश्वर' या पुस्तकात पृ. ३३३ व ३३४ वर म्हणतात "नामदेवाला आग्रहाने तीर्थयात्रेला घेऊन जाण्यात ज्ञानेश्वराचा हेतु तीर्थयात्रेच्या पुण्यापेक्षा उत्तरेकडील तीर्थयात्रेने इस्लामी पराक्रमाच्या धुमाकुळाची प्रत्यक्ष माहिती नामदेवास करून देणे हा होता!" हा केवढा कल्पनाविलास! तेराव्या शतकात आमच्या हिंदूंच्या डोक्यात उत्तरेच्या यात्रेत गयेत पिंडदान करून पितराना मुक्ती देणे हेच थैमान होते. ज्ञानेश्वरासारखे व नामदेवासारखे संत मुसलमानी जुलमांचे थैमान पहाण्यास जाणे शक्यच नव्हते "इतिहासज्ञ झाला म्हणुनि काय भलतेच बोलावे." श्री. पुरंदऱ्यानी यांचाच आधार घेतलेला दिसतो!

देवे मुसलमाना साह्य केले।
यामुळे इस्लामी राज्य येथे झाले।
ऐसे हिंदूनी सहज मानले।
देव कर्ता करविता॥ ३८॥

त्या काळात आमच्या डोक्यात 'देश,' समाज, 'देशाचे स्वातंत्र्य' या कल्पनाच नव्हत्या. इहलोकापेक्षा आमची परलोकाकडेच दृष्टी खिळली होती! आणि हा परलोक, धर्मकर्माने, अथवा अध्यात्मज्ञानानेच साध्य होणार. क्षत्रिय, जे असतील त्यांनी राजकारण करावे. प्रत्येक वर्णाने आपल्या वर्णधर्माने वागावे. मागच्या जन्माच्या कर्माने मनुष्य सुखदुःखे भोगतो. प्रयत्न व्यर्थ आहे. एक भक्ति खरी आहे इत्यादि कल्पनांचे प्राबल्य फार होते आणि प्रस्तुत चरित्रग्रंथांत तरी काय आहे. ग्रंथ सर्वतोपरि चांगला असला, तरी त्यात पूर्वीचा महादोष आला आहेच तो दोष म्हणजे, केवळ ईश्वरी अवतारामुळेच शिवाजीसारखा अवतार झाला! हे ठसविण्याचाच प्रयत्न ग्रंथकार करीत आहेत. 'उषःकाल' या प्रकरणात पृ. ८९ वर "मालोजी जर हयात असते तर–

"जगदीश्वरा! शिवा! नको अंत पाहूस! आमची जिजा गरोदर आहे! आता तूच माझा नातू होऊन ये! तुळजाभवानी शिवाजीस प्रसन्न होती. शिवाजीला जर तुळजाभवानी प्रसन्न होती, व त्यानी जे एवढे पराक्रम केले, त्यांत आश्चर्य कसले? नुकत्याच जन्मलेल्या श्रीकृष्णाचे पाय यमुनानदीच्या भयंकर पुराला लागल्याबरोबर यमुना नदी दुभंग झाली आणि 'देवकी' पासून 'यशोदे'कडे श्रीकृष्णास सहज जाता आले! त्याचप्रमाणे अफझुलखानास देवीने इतकी मोहिनी घातली की, तो लढाई न करता शिवाजीस भेटण्यासाठी जावळीसारख्या अवघड ठिकाणी एकटाच आला, आणि शिवाजीच्या हस्ते भवानीनेच त्याच्या पोटात बिचव्याचे तीक्ष्ण पाते खुपसले व तो मरून पडला असे का म्हणू नये? वस्तुतः शिवाजीच्या चरित्रात शिवाजी, जात्याच, जसा शूर, व धाडसी तसाच अत्यंत युक्तिबाज होता. शारीरबलाबरोबरच त्याचे बुद्धिसामर्थ्यही अद्वितीय होते! अनेक संकटे आली, पण प्रत्येक संकटाला लढाईपेक्षा युक्तीने त्याने आपली सुटका करून घेतली.

अफझलखानाशी अथवा शाहिस्तेखानाशी मैदानावर सामना देऊन त्यांच्या अफाट सैन्याला तोंड देणे शक्य नव्हते पण त्यांच्यापेक्षा बुद्धीने ज्यास्त आहोत ही खात्री शिवाजीस असल्यामुळे प्रत्येक वेळेस धाडस करून स्वतःचे जीवित धोक्यात घालून त्याने जय मिळविले. अफझलखानाच्या अथवा शाहिस्तेखानाच्या वेळेसही हे शत्रू परस्पर विश्वासघात करून एकमेकास ठार करण्याच्या विचारातच होते. फक्त अगोदर तडकाफडकी जो विश्वासघात करील त्याचा जय! हे जाणूनच प्रत्येक वेळेस अगोदर शिवाजीनेच आपला डाव साधला! मुख्य मेल्यामुळेच पुढे सैन्य नमले। पण








चरित्रकार जेव्हा शिवाजीच्या बुद्धिसामर्थ्यापेक्षा त्याने तुळजाभवानीचे स्मरण केले, निघण्यापूर्वी भवानीस साष्टांग नमस्कार घातला, भवानीचा आशीर्वाद घेतला असले 'फुजूल' वर्णन करीत सुटतात तेव्हा तुमच्या आमच्यासारख्या सामान्य जनास वाटते.

"छे: कोणीकडे शिवाजी, कोणीकडे आम्ही ! त्याला भवानी प्रसन्न होती म्हणूनच त्याने एवढे पराक्रम केले ! देवाच्या प्रसन्नतेशिवाय पराक्रम होणे शक्यच नाही ! अशा भ्रांत भावना आज हजारोवर्षे आमच्या मठ्ठ डोक्यात ज्या विळखा घालून बसल्या आहेत. त्यांचा विळखा अद्याप यत्किंचितही सैल होऊ शकत नाही !

श्री. पुरंदरेही शिवाजीस ईश्वरावतारच समजतात ! हे वर्णन पहा ! पृ. ९२

"पुत्र झाला ! गडाचे तोंड साखरेहून गोड झाले ! आईसाहेबांच्या महालापुढे पखालीतून आणि घागरीतून धो धो घातलेले पाणी वाग वाटा वाहात निघाले ! खळखळणारा ओघ वेशीला आला ! पुत्र कोणाला झाला ! पुत्र जिजाबाईसाहेबांना झाला ! पुत्र शहाजी राजाला झाला ! पुत्र सह्याद्रीला झाला ! महाराष्ट्राला झाला ! भारतवर्षाला झाला ! प्रत्येक जलौघ वळसे घेत घेत दिल्लीच्या, विजापूरच्या, गोव्याच्या, मुरुड जंजीऱ्याच्या आणि गोवळकोंड्याच्या वेशीकडे धावत होता ! तेथल्या मग्रूर सुलतानांना, बातमी सांगायला की, **आला ! आला सुलतानानो ! तुमचा काळ जन्मास** आला तुमच्या आणि तुमच्या उन्मत्त तक्तांच्या चिरफळ्या उडविण्याकरिता कृष्ण जन्मास आला"

वस्तुतः प्रथम मुलाच्या जन्मास आईबापाना आनंद होतो. जिजाबाईसाहेबांचा पहिला मुलगा संभाजी त्याच्या जन्माच्या वेळेस जो आनंद झाला असेल तसा 'शिवाजी'च्या जन्माने आनंद होणे स्वाभाविक नाही. 'शिवाजी' सामान्य मनुष्य म्हणूनच जन्मास आला.

पुढचे वर्णन पहा, हे वर्णन शिवाजीच्या कुंडलीचे आहे ज्या ज्योतिषानी ही कुंडली केली तो म्हणाला म्हणे—

'महाजन हो। पृथ्वीचे भाग्य उदेले! या भूमंडळाचे ठायी अतिथोर सौभाग्यमुहूर्तावर कुमार जन्मास आला आहे !

हा सुपुत्र दिग्विजय करील !
हा परम साहसे करील !

"आपली कीर्तीही दिगंताला नेईल ! हा आपल्या सत्तेत गिरिदुर्ग, जलदुर्ग, वनदुर्ग, स्थलदुर्ग ठेवील. श्रांत पृथ्वीस हा शांत करील ! सकल भूमीचे ठायी यश कीर्ति प्रताप महिमा वाढून हा चिरंजीव होईल." "शिवाजीची कुंडली पाहून त्या ज्योतिष्याने हे लांबलचक भविष्य वर्तिवले" असे ग्रंथकार लिहितात. हा भविष्याचा उतारा कदाचित शिवभारतातील असेल. यावरून अनेक शतके, नव्हे आतासुद्धा आमची संस्कृती मनुष्याला अत्यंत तुच्छ समजत आहे ! ईश्वरसत्ता, व आकाशस्थ ग्रहांची सत्ता या सत्तेच्या प्रसन्नतेवाचून मनुष्य काहीही करू शकत नाही. हे आमच्या मेंदूत अनेक शतके जे ठसले आहे, ते श्री. पुरंदऱ्यांच्या डोक्यातूनही कायम आहे या ग्रंथास हे देवपिसेपणाचे जे गालबोट लागले आहे, त्याकडे दुर्लक्ष केले तरच हा ग्रंथ प्रेरक होईल.

**वा. दा. गाडगीळ**

---








